آباد خلاف مرضی جناب اقدس اعلی البتہ بسمع سامی رسیدہ
باشد بنابران از بارگاہ آسمان جاہ صوبہ داری صوبہ بہار از
ایشان تغیر و بمرشد زادہ عالم و عالمیان محمد ہدایت بخش
بتفوض (مفوض) و بخیر خواہ خلق الله نیابت بدستور سابق مقرر
گشت و مکرر شقہ خاص فیض اختصاص محتوی بر ارشاد اینکہ
محمد عالی گوہر مجوز عقوق حقوق و بنعمت گردیدہ بخیال
باطل ارادہ ان سمت نمودہ اند چون الحال علاقہ صوبہ داری
بایشان نماندہ در صورت رفتن ان سمت سد راہ شود و ہرقسم
داند دستگیر کردہ بحضور بفرستند چنانچہ نقول شقہ جات برای
ایشان فرستادہ ہیچ فائدہ نکرد وبا مہاراجہ رام نارایں بہادر
نایب آنجا ورجک سبقت نمودند ناچار مرمی الیہ قلعہ بند
گردیدہ برای محافظت ناموس عالمی آنچہ لازم احتیاط و
قلعہ داراست بکاربردہ تا یازدہ روز از ان طرف روشہا بعمل
آمد و ازاین طرف برفع و دفع قصور نرفت آخرروزدوازدہم
حتی المقدور تلاشہای قلعہ گیری پختہ ... از توت بفعل آوردند
و جمع کثیر ہمراہیان خود را بکشتن دادہ بمقتضائی من
تحی براست فقد رنج کلبانگ فرار بر قدم زدہ مراجعت
فرمودند الحال برطبق حکم اطاعت لازم جہت دستگیر کردن
ایشان نورچشم بہ از جان نواب ناصرالملک بہادر و نواب
تانجنگ بہادر و مہاراجہ رام نارایں بہادر با افواج بحر
امواج بتعاقت میروند تا سرحد خود سعی و تلاش خواہند کرد
کہ ر بہ بست آرند نظر بریگانگت ویک جہتی بنابراطلاع سامی

متصدع گشت ایام عزت و زیادتي جاودانے باد
بتاریخ ششم شهرذی قعدہ سنہ ۲ رسید

## ۳۵

[درسکہ مدور] ۳۲ وکیل مطلق امیرالامرا مختارالممالک مدارالمهام السلطنت عمدۃ الاراکین الخلافت سردار کثیر الاقتدار یاروفادار سپہ سالار سعادت مند بجان پیوند فرزند خاص الخاص معلی جاہ پندت پردهان مهاراجہ دهراج سوائی مادهوراؤناراین بهادر فدوی شاہ عالم بادشاہ غازي ۱۲۰۴

شجاعت دستگاهان احمد خان و نیازبیگ محفوظ باشند راجے سری باپوجی ملهار بنابر بندوبست محالات سرکار سهارنپور وسرکار فیضاباد و پانی پت وغیرہ محالات از حضور تعین شدہ اند لهذا نگارش می رود کہ آن شجاعت دستگاهان معہ جمعیت خود نزد مشارالیہ حاضر بودہ بموجب ایمائی معزالیہ بتقدیم خدمت پرداختہ لوازمہ نکوخدمتی بظهور (ر) سانیدہ راضی دارند و تنخواہ خود از روز حاضر شدن بمشارالیہ میگرفتہ باشند و بابت باقیات طلب سابق از راجسری مذکور تقاضا و دقت نسازند درین باب تاکید دانند

## ۳۶

...... درین ...... بسبب خطرہ راہ کہ از چندین بترقیم و ترسیل مکان ...... محبت آیات بپرداختہ این معنی موجب کمال ...... خاطر است و سلسلہ رسل رسائل فیمابین مخلص وآن مهربان کہ دهرآن و زمان تقدیم مراسم این سر رشتہ نوشت خواند هر رئیسان و محبان سرکار کمپنی انگریز بهادر

از مشتریات و واجبات متصور حسب دلخواه بعمل نیامد باعث تشویش و تردد زیاده از حد گردید متعهد و چونکه دل دوستی منزل مخلص درباب قدیم مراتبات محبت و وداد و تحریر سررشته مراسلات که فی الحقیقه المکتوب نصف الملاقات ست در ایام سابق نوعی اغماض و تغافل جایز نداشته یقین خاطرکه آن مهربان بسبب پاس مراسم محبت و وداد فیمابین که باوصف بعید مسافت و خطره راه بترسیل مکاتبات منقوش مزاج این طرف است متضمن خاطر آن مهربان هم بوجه باشد چون درین ولا لشکر ظفر پیکر مکانی را مخیم سرادقات اقبال و مستقر لوائے نصرت و اجلال ساخت که خطره راه از میان برخواسته شد مخلص اتفاق وقت مستحسن پنداشته بترقیم مکاتبات و اطلاع حالات میپردازد چنانچه بعد فتح قلعه بنگلور باسواران مرتب و خوش ایند متعینه سرکار نواب صاحب والا قدر نواب آصف جاه بهادر ملاقات نموده سابق ازین مفصل اطلاع این معنی ها بخدمت آن مهربان کرده عازم قلعه سیرن پتن که حصن حصین معاندان و مستظهر بقیه السیف مقهوران ست گردیده از آن جاکه فوج مخالف پیش از ورود مخلص در آن نواح داخل شده جهت سلامتی و امنیت خودها مکان مستحکم و مضبوط اطراف قلعه مذکور را در قبضه خود آورده قلعه سیرن پتن را معه جزیره برپشت لشکر خود داشته ایستاده بودند مخلص کوچ نموده بمقابله فوج مخالف بتاریخ یازدهم شهر رمضان بجنگ پرداخته و از فضل الهی بعون همت دوستان

شکر مخالف تاب جنگ نیاورده شکست فاحش خورده پس
گشت و از دست جرأت و جوان مردی سپاهیان لشکر ظفر
پیکر این طرف بجز پناه قلعه مذبور ...... بجانب شمال جزیره
مذکور نو احداث کرده بودند در آن وقت منعدم و منهدم می
گشت و باوصف این پشت پناه در قبضه مخالف بسیاری از
جماعه مقهور کشته و زخمی گشته چهار ضرب توپ برنجی معه
نشان بے شمار بدست بهادران لشکر افتاد از ان جا که ظهور
این قسم درجات تازه موجب شگفتگی خاطر دوستان است
او تعالی خوشی این معنی با هزاران تصورات شادمانی بر
آن مهربان مبارک گرداند چنانچه بعد ظهور این فتح نمایان
در مکان مقبوضه مخالف علم نصرت و فیروزی برافراخته
مخلص اراده محاصره قلعه سرن پتن میداشت اما چون از
باعث شروع شدن ایام برشکال و کم یابی کاه و علف که صورت
نا طاقتی و کم زوری نرگاوان توپ کشی بآن درجه گردید که
نوعی امید تقدم محنت و قوت موافق اراده مکنون خاطر
مخلص باقی نماند و امراض حیوانات . شدامد باران و
نایابی کاه و دانه بدرجه رسید که هزارها جانوران تلف شدند
مخلص ازین عزم دست بردار گشته تا آخر ایام برسات موقوف
داشت درین روزها از فضل الهی متوجه دوستان آن نوع ظفر
موج سرکار پیشوا صاحب بهادر بسرکردگی پندت صاحب بسیار
مهربان هری پندت تانبا صاحب بهادر و بهاؤ صاحب ان مهربان
پرسرام بهاؤ صاحب بهادر ملاقی شده و خبربات بظهور پیوست

ظاید وجهت ازان جاکه فیمابین سرکار کمپنی انگریز بهادر و پیشوا صاحب بهادر بنوعی مبانیت و مغایرت متصور نیست بصلاح صواب دید مخلص و تاتیا صاحب بهادر که درست این ریاست و دولت خواه سرکار پیشوا صاحب و بدانائی و دور اندیشی نیز ندارند چنین تقرر یافته که تا باواخر این ایام برشگال انواج بحر مواج بر بالاگهات رحل اقامت افگند چنانچه برطبق این نقشه که از سپاس الهی موجب تزاید عبرت و خوف خاطر مخالف خواهد گردید ............ نصرت قرین به تردد و تدبیر اسباب و لوازم لایق انصرام مهم را بکار... برملک بالاگهات متوجه شده... سرکار کمپنی انگریز بهادر و آن مهربان اختفای اسرار و خواهش و یکسار کرد ... که ... جزیره بود چون ......... کلان بود ان را از صبغه ...

## صحت نامہ

| صفحہ | سطرہ | غلط | صحیح |
|---|---|---|---|
| ۲ | ۳ | کماں | تکماں |
| ۲ | ۸ | الرا | العمرا |
| ۳ | ۱ | دروری | درودی |
| ۳ | ۱۰ | و و | و |
| ۶ | ۱۴ | مدطلہ | مد طلہ |
| ۶ | ۲۱ | پشسی | پعشنی |
| ۸ | ۱ | ۵ | ۶ |
| ۱۳ | ۱۷ | سہر | سہر |
| ۱۴ | ۴ | صدرب | صدرت م |
| ۱۷ | ۱ | وسالر | وسالم |
| ۲۰ | ۱۷/۱۵ | نہم | نعم م |
| ۲۱ | ۲۱ | بانحاح | باتحاج م |
| ۲۳ | ۷ | داشس | درشش |
| ۲۶ | ۲۱ | س | ایں |
| ۳۷ | ۱۲ | اس | ایں |
| ۳۸ | ۳ | پیاها | پیاها |
| ۳۹ | ۱۱ | ورحک | ورحک م |
| ۳۹ | ۱۷/۱۶ | من تدی | من تدی۔ |
| ۳۹ | ۲۱ | نتعاقت | نتعاقب |
| ۴۳ | ۱ | طاند | طاید م |

# ऐतिहासिक फार्सी साहित्य ४ था खंड

## १ पेशवे दप्तर-पत्रें

जखर १६ } १ { श. १५७० आषाढ वद्य ४
इ. १६४८ जून २८

रहमाजी ज्योती अर्ज करतो कीं, तागायत १६ जखर तंजावर येथें परमेश्वर व आपण यांच्या कृपेनें ठीक आहे. आपण कासिद व महालदार यांजबरोबर सराफराजनामा पाठविला तो ता. १५ रोजीं सायंकाळीं नमाजाचे वेळीं पाऊन धन्य झालों. पोटाचा विकार ...... ता. १२ माहे मजकूर पर्यंतचे दोन अहवाल आपल्या सेवेस पाठविले ते पावून हकीकत समजली असेल. बहमती (भामती ?) वैद्याविषयीं हुकूम झाला कीं, उपर्युक्त महालदाराबरोबर कांहीं माणसें पाठवून त्या गौरस वैद्यास रवाना करावें. महाराज तो सेतुबंध रामेश्वरास गेला होता. या चाकराबरोबर तो आला नव्हता. पण नंतर तो या चाकराकडे आला असतां त्यास ताकीद करून व वाटखर्ची देऊन, भुजबलरावाच्या संगतीनें आपल्याकडे रवाना केलें. आजला तो तथें पोंचला असेल. सध्या रायल म्हणतो कीं, विजयराघव तंजावरकराशीं चर्चा करून भेट करून देईन. पण त्याच्या शब्दावर कोणताही विश्वास ठेवतां येत नाहीं. सेवेच्या बाबतींत कर्नाटकयांची पद्धति उत्तम माहीत आहे. या चाकरानें महाराजांना पाठविण्याविषयीं अनेकदां अर्ज लिहिले आहेत कीं, रायल, चंडलोर व महाराज यांमध्यें दळणवळण आहे आणि यांचें म्हणणें तर असें आहे कीं, महाराज आल्यावर ते शपथ देतील तर मग करारप्रमाणें पैशाची व्यवस्था करावी लागेल. साहेबांनींही महाराजांना यासाठीं उपर्युक्ताकडे शक्य तितक्या जलदीनें, क्षणाचाही दिरंग न करतां पाठवावें. हे लोक घडपणें मोहीम पार पाडूं देतील तर ठीकच; पण कदाचित् हरकत करतील तर त्यांस तंबी देऊन कामाचा निकाल करण्यांत येईल. या चाकरानें इकडील कांहीं पाळेगार व मनेवार यांना धीर व वचनप्रमाण देऊन वश करून घेतलें असून त्यांशीं करार केला आहे कीं, त्या पाळेगारमनेवारांना खर्चास व मान म्हणून कांहीं द्यावें. त्यांनीं २५।३० हजार प्यादे घेऊन या

चाकरच्या डेऱ्यासमोर यावें. मनेवारांपैकीं तिघांना शिक्षा केली पाहिजे. निदान धमकावणीसेरीज कांहीं होणार नाहीं. या चाकरापाशीं दोन हजार उत्तम स्वार असते तर हा चाकर या पाळेगारमनेवारांस खर्च व तशरीफ देऊन आणि या दरबारास अनुकूल करून घेऊन त्या काफिरांचे दांत पाडता व आजला कामाचा निकाल करून आपल्या सेवेस हजर झाला असता. पण काय करूं? एकटा पडलों. साहेबांनींही इकडे येणें योग्य होणार नाहीं. जेथें आले आहेत तेथेंच त्यांनीं मुक्काम करावा. साहेबांनीं महाराजांस रवाना केलें असल्यास ठीकच. नसल्यास शीघ्र पाठवावें; म्हणजे सेवक शब्द दिलेल्या पाळेगारमनेवारांना (पंचवीस तीस हजार प्यादे व कांहीं स्वार यांसह) बोलावून घेऊन कांहीं खर्ची व मानपान देऊन महाराजांसमोर आणील आणि त्यांस धमकावून त्यांपैकीं तिघांना शिक्षा देऊन राज्याचें कल्याण केलें जाईल. मनेवारांपैकीं तिघांतही पुरें वैर पडलें आहे. जो अधिक बलिष्ट असेल त्यास कैद करून उपाय केला जाईल. शिवाय असे मुद्दे आहेत कीं, ते लेखांत लिहितां येत नाहींत. हर उपायानें महाराजांना पाठवून यावें. हा अर्ज हजार अर्जांच्या ठिकाणीं समजावा. रायल व विजयराघव यांच्या पाहुणचाराविषयीं हकीकत आपल्या सेवेस लिहिली आहे. स्पष्ट झाली असेल. मधुरेचा त्रिमलनायक व विजयराघव यांत पक्कें वैर पडलें आहे. त्रिमल नायकाचे मुतालीक रायलास म्हणतात कीं, जसे जिंजी व तंजावर येथें आला तसे त्रिचनापल्लीसही या. उलट विजयराघव रायलास म्हणतो कीं, त्रिमलनायक स्वतः येऊन तुम्हांस बोलावील तर तुम्हीं जावें; नाहीं तर त्याचा गुमान तो काय? महाराजांस बोलावून द्रव्य नजर करीन व त्रिमलनायकास तंबी देऊन पेशाचा करार असेल त्याचा निकाल करीन. ता. १५ माहे मिनहूस रात्रीं रायलानें विजयराघवाच्या घरीं जाऊन चर्चा केली. उद्यां अगर परवां या बंधाशींही चर्चा व्हावयाची आहे. घडेल तें सेवेस लिहिलें जाईल. त्यावरून स्पष्ट होईल. शिवाय लिहिलें होतें कीं, हजरत............

---

२

श. १६४६ आश्विन
इ. १७२४ आक्टोबर

श्रीपतराव वलद परशुराम पंडित प्रतिनिधि हा प्रणामपूर्वक अर्ज पाठवितो कीं, या पूर्वी राजा शाहू व हा चाकर यांच्या चाकरी—जिची मरहूम मुबारिझ— याच्या संगतींत प्रगति केलीची हकीकत पूर्वी दरबारास पावली असेल. उप

प्रमाणें नशीबीं न घडल्यानें निष्ठेचा कायमपणा मनाप्रमाणें प्रत्ययास न आला. आतां उमेद घरतों कीं, पादशाही कामासाठीं जो मनुष्य इकडे नेमला जाईल, त्याजबरोबर आपल्या मर्जीप्रमाणें प्राणार्पणाच्या तरतुदी प्रकट कराव्या.

---

} ३ { श्रा.
इ.

यादगारखान किंवा खान दौरान → बाजीराव पंडित प्रधान

पुष्कळ काल गेला कीं, कृपापत्र आलें नाहीं. यामुळं हकीकत समजण्याविषयीं उत्सुक आहे. हुजूरकडून विरोधकास तंबी देण्यासाठीं कूच करून जलदीन तेथें जाण्याविषयीं ताकीद–उर्याविषयीं महादेव पंडितानें लिहिलें असेल–आहे आणि हकीकती ऐकल्यावर कृपा व्हावयाची आहे. अपेक्षा आहे कीं, ताकीदीप्रमाणें कूच करून त्या बाजूस जाल म्हणजे मुजरा होईल. नेहमीं आपली हकीकत कळवून सुखी करीत असावें. उदंड आयुष्यैश्वर्य लाभो. या मित्राकडून आपली एकनिष्ठ चाकरी, प्राणार्पण, इत्यादींविषयीं जो प्रयत्न केला गेला तो राव महादेव पंडितानें तपशीलवार गुजरला असेल. उमेद आहे कीं, लश्कर ( विरोधकांस तंबी देण्यासाठीं ) आपण केलेल्या कूचाची खबर हुजूर पोचावी. म्हणजे मन इच्छितें तितकें यश मिळाल्यासारखें होईल.

---

} ४ { श्रा.
इ.

यादगारखान → चिमाजी आप्पा

आपलें पत्र बाबूराव व घोंडो पंडित यासागातीं आलें व समाधान झालें. आणि आपण मुखवचनेंकरून सांगितलेल्या मागण्या त्याच्या बोलण्यावरून स्पष्ट झाल्या. नवाब व आसफजाह बहादुर माळवा सुभ्यांतून परतून हुजूर सेवेस आले सुभ्याची नायबी व जागीरींची तनखाह याविषयीं आपल्या मागण्या हुजूरच्या कानांवर घातल्या. नवाब व बक्षीउल्ममालिक हे पहिल्यापासूनच या कामास मूळ होते.

---

} ५ {श.
{इ.

? → बाजीराव

पेशकशीसह हुजुरास अर्ज पाठविला होता तो नजरेखालीं घातला. आम त्याप्रमाणें फर्मान झाला. आपले विश्वासू बाबूराव यांस सूचना केल्या आहेत त प्रमाणें वागावें. म्हणजे कृपा आहेच असें समजा.

---

मुहम्मदशाहाचा
जु. १७ शाबान २७ नंतर } ६ {श. १६५६ पौष वद्य १४
{इ. १७३५ जानेवारी ११

पत्रोत्तर पाठविलें तें पावलें. आपल्या हेतूंचा प्रामाणिकपणा व बादशाहास प्रणाम हें समजलें. धोंडोपंडिताच्या सांगण्यावरूनही कित्येक गोष्टी कळल्या. शुभचिंतकानें बंदोबस्तासाठीं वझीरुलममालिकाबरोबर हुजूरकडून विदा होऊन ता. २७ शाबान सन १७ रोजीं महाराजाधिराजासह कसबे रणथंबोर येथें तंबू ठोकले. वझीरुलममालिक अकबराबादेच्या मार्गानें येऊं चाहतात. आतांपर्यंत चंबळा उतरले असतील. कूचावर कूच करून नर्मदातीरावर येऊन पोचतील. परमेश्वरी व बादशाही कृपेवर भरोसा ठेवून व धोंडोपंडित तोंडानें जाहीर करील त्याप्रमाणें चित्त समाधानांत ठेवून लष्कर रवाना होऊन आम्हांस भेटीचें सुख द्यावें. परमेश्वरी इच्छा असेल तर आपल्या कित्येक मागण्या—ज्याविषयींच्या अर्जावर दस्तखत झालें होतें—आपल्या इच्छेप्रमाणें फलद्रूप होतील पादशाही कृपा उत्तरोत्तर परिस्थित्यनुरूप होत राहील. सर्व हकीकत महाराजाधिराज व धोंडोपंडित यांच्या पत्रावरून व मुखवचनेंकरून व्यक्त होईल. आपले मुद्दे राहिले असतील ते भेट झाल्यावर निकालांत निघतील. आम्हास आपले सुहृद समजून आपल्या मनांत असेल तें अमलांत आणावें आणि सर्व कामांचे बाबतींत मनःसमाधान ठेवावें.

---

९

} ७ {श. १६५७ आषाढ-श्रावण
{इ. १७३५ जून-जुलै

धोंडोपंडित पोचल्याचें, पादशाही चाकरीवर कायम असल्याचें व या वर्षी दरबारास सलामीसाठीं न येण्याच्या सबबीचें पत्र पावून समाधान झालें. आपला प्रामाणिकतेचा पक्केपणा व हेतूंची शुद्धता या गोष्टी काल व दैव यांना

उलट्या उलट्या देणाऱ्या आहेत. याविषयीं अनेकदां लिहिलें आहे. या गोष्टी हजरतांस नीट अवगत झाल्या. अशा प्रकारेंच महाराजाधिराजांनीं लिहिलें असेल. आधिक्य झालें असतांही आपल्या समाधानासाठीं राजाधिराजांच्या विनंत्यनुसार राणोजी शिंद्यास दया दाखविली गेली ती अवगत झाली असेल. धोंडोपंडितानें जाहीर केल्याप्रमाणें गेल्या वर्षी आपल्या आगमनाची फार वाट पाहिली. पण तें घडलें नाहीं. या वर्षी आगमनहेतू तहकूब करणें उचित नाहीं. कराराची निष्ठा अमलांत आणावी. आपण इकडे येण्यासाठीं घरून निघतांच येथील उमरावां-पैकीं एक मातबर उज्जयिनीपर्यंत पाहुणचारासाठीं पुढें येईल. नंतर दोघांनीं मिळून दरबारास यावें. उज्जयिनीस पावल्यापासून मनसबीच्या सनदांची तयारी आणि जागिरीच्या महालांत दखल होणें या बाबत धोंडोपंडित व चाहगारखान यांमध्यें जो करार झाला तो अमलांत येईल. आपल्या मातुश्री गंगास्नान व इतर ठिकाणच्या यात्रा यांच्या इराद्यानें जयनगरला पोचल्या आहेत. आमचे कांहीं विश्वासू चाकर नियुक्त केले आहेत. हेत हा कीं, त्यांनीं येतांजातां त्याबरो-बर असावें म्हणजे कोणी अडथळा करणार नाहीं. शाहगडच्या चिन्याचीं दोन ठाणें हरकाऱ्यांबरोबर पाठविलीं तीं पावलीं.

---

| | | |
|---|---|---|
| मुहम्मदशाहाचा<br>जु १८ रसर ४ | ८ | श १६५७ भाद्रपद शुद्ध ६<br>इ १७३५ आगस्ट १२ |

पूर्वी आपल्या मागण्याविषयीं पाठविलेल्या कागदावर—जे करारनामे केले आहेत ते कायम राहाण्यावर नजर देऊन—दस्तखत करून धोंडोपंडिताबरोबर पाठविले होते. दुसरें असें कीं, बादशाही फौज त्या बाजूस गेली आहे. पूर्वीच्याच करारानुसार राणोजी शिंद्यावर कृपा झाली. गेल्या सालीं कांहीं अडथळ्यामुळें आपलें येणें झालें नाहीं या वेळीं मोसमाच्या आरंभींच हुजुरास रवाना व्हावें. याच विषयीं बाबूजी पंडिताबरोबर पाठविलेलें पत्र समजलें. म्हणून उपर्युक्त वकिलास आमचा विश्वासू उधोजी यासह पाठविलें आहे. त्यांना जें कांहीं मुस-वर्षनेंकरून सांगितलें तें ते निवेदतील. तुम्हीं त्याप्रमाणें यथाशक्य करावें. आपल्या करारांवर कायम असावें. तें तुमची अब्रू व विश्वास यांच्या वाढीस कारण होईल. भेटीस आल्यावर सर्व मुद्दे निकालांत निघतील सय्यद जमाल-खानानेंही आपणांस उत्तराचें पत्र लिहिलें आहे तो या दरबारचा आनुवंशिक खानजादा असल्यानें त्यानें लिहिलें तें करण्यास योग्य व मागण्यांच्या निकालास उपयुक्त आहे असें समजावें. ता. ४ रबिलाखर जुलूस सन १८.

---

मुहम्मदशाहाचा ज. १८ रमा २४ } ९ { श. १६५७ भाद्रपद वद १० इ. १७३५ सप्टेंबर १

पत्र पाठविलें तें पोंचल्याचें सुख मिळालें. आपण निघण्याचा विचार केल्याचें व आपली भेटीची इच्छा असल्याचें व इतर लिहिलें तें कळलें. ऐक्याची वळकटी वगैरे मनावर इतकी बिंबली आहेत कीं, ती सांगण्याची आवश्यकता नाहीं. गेल्या सालीं धोंडोपंडितानें केलेल्या प्रामाणिकपणाच्या करारावर नजर देऊन आपल्या येण्याची वाट पाहिली. पण येणें न झालें. आपण बादशाहाविषयीं जी निष्ठा धरतां तीस योग्य आहे का, दसऱ्यापूर्वीच आपण बादशाही उंबरठ्याच्या सलामीसाठीं येण्यास प्रस्थान करावें. तें न घडलें तर दसऱ्यानंतर तरी आपण थांबूं नये. या बाबतींत पूर्वीच हरकाऱ्यांबरोबर तपशीलवार लिखित पाठविलें असून त्याच्या जाबाची वाट पहात आहों. आपण वतनाहून हलल्याची खबर येथें पोंचतांच बादशाही चाकरांपैकीं एका मातबरास उज्जयिनीपर्यंत पाठवितों. आपल्या स्वागताचा पाहुणचार तो करील. मग दोघांनीं दरबारीं येण्यास निघावें. धोंडोपंडिताच्या विनंतीप्रमाणें आपसांत जे करारमदार झाले आहेत तदनुसार चित्त समाधानीं ठेवावें. परमेश्वर इच्छील तर ते कमीजास्त होऊन अमलांत येतील आणि आपणावर पादशाही कृपा होईल. आपल्या मातुश्री मथुरेस पोंचल्या. त्यांजबरोबर मनसबदार व गुर्जबरदार दिले आहेत. हेतू हा कीं, त्यांनीं गंगा, गया इत्यादि ठिकाणीं त्यांजबरोबर असावें. म्हणजे येण्याजाण्याचे मार्गांत कोणी अडथळा करूं शकणार नाहीं. ता. २४ रबिलाखर जुलूस सन १८.

---

मुहम्मदशाहाचा जु. १८ रजब ९ } १० { श. १६५७ मार्गशीर्ष शुद्ध १० इ. १७३५ नोव्हेंबर १३

खान दौरान → धोंडोपंत.

अर्ज पावला व मजकूर समजला. बाजीराव पंडित प्रधान यांचा बादशहाच्या भेटीस येण्याचा हेतु समजला. त्यांची उत्तम चाकरी, सरळपणा, कराराविषयीं प्रामाणिकता याविषयीं हमेशा यादगारखानानें जें प्रकट केलें तेंही स्पष्ट झालें आहे. कराराप्रमाणें दरबारांतून एक मातबर अमीर विदा होत आहे त्यानें प्रधानांकडे जाऊन त्यांस हुजूर आणावें. शिपायांच्या रोजमऱ्यासाठीं पाच लाख रुपयेही हवाला झाले. त्यांच्या मागण्या व विनंति-अर्ज यांवर पूर्वींच दसखतें

हाती आहेत. कांहीं कमजास्त करून निकाल होईल. पूर्वीचे मुकद्मे निकालांत निघाल्यामुळें आतां उज्जयिनीजवळच थांबूं नये. हुजूरचें लिहिणें व बरोबरच्या शिपायांचा रोजमरा पावल्यावर जलदीनें हुजूर रवाना व्हावें. आम्हांस आपल्या भेटीची फार इच्छा आहे. तपशील यादगारखानाच्या पत्रावरून समजून येईल.

---

| | | |
|---|---|---|
| मुहम्मदशाहाचा<br>जु. १८ रमजान ९ सोम. | ११ | श. १६५७ माघ शुद्ध १०<br>इ. १७३६ जानेवारी १२ |

राजा अयामल → बाजीराव

ब्रह्ममूर्ति महादेवभट येथें पावलेचें लिहून कळविलें होतें तें आपणांस समजलें असेल. आज ता. ९ रमजान सन १८ सोमवार रोजीं हा सेवक महाराजाधिराजांपासून विदा होऊन डेरेदाखल झाला. आतां दर मजल फौजेसह कूच करीत आपणांजवळ येऊन पावेल. इतर ब्रह्ममूर्तींच्या लिहिण्यावरून स्पष्ट होईल. अधिक त्रास काय द्यावा.

---

| | | |
|---|---|---|
| मुहम्मदशाहाचा<br>जु. १९ रसर ४ | १२ | श. १६५९ श्रावण शुद्ध ५<br>इ. १७३७ जुलै २१ |

? → बाजीराव पंडित

१०१ मोहरांसह पाठविलेली तुमची हेतूंचा प्रामाणिकपणा आणि निष्ठेचा कायमपणा इत्यादींनीं भरलेली अर्जी मन्सूरजंग यांच्या मध्यस्थीनें नजरेखालून गेली आणि अक्षर न् अक्षर यादगारखानानें अर्ज केला त्यावरून समजलें. आपणां-वर कृपा करण्याच्या इच्छेनें आपल्या मित्रांसह आपणांस मनसबा, जागीरी, महाल व वतनें दिली आहेत. शिवाय पोशाक, जीघा, जडावाचा सिरपेच, मोत्याची माळ, एक हत्ती, एक घोडा, या वस्तूही देत आहों पादशाही कृपेचें सामर्थ्य जाणून व कृपेबद्दल योग्य रीतीनें आभार मानून पादशाही सेवेंत प्रगति करून दाखवावी. ता. ४ रबिलाखर जुलूस सन १९.

---

| | | |
|---|---|---|
| | १३ | श.<br>इ. |

पंडित प्रधान बाजीराव यांच्या मागण्या

( १ ) जिंजीचें राज्य पूर्वीपासून स्वर्गवासी सीवा याचें होतें. त्याप्रमाणें तें राजा शाहूस मिळावें. त्या प्रांताच्या फौजदारांनीं तंजावरच्या राज्यांत अट-

यत्न करून तें बटकाविलें आहे ते याजुस घ्यावे. पूर्वीच्या रिवाजाप्रमाणें हें प्रांत राजा शाहूस मिळावा. ( २ ) पंडित प्रधान कर्जामुळें ओरीस आले आहेत तरी त्यांस खर्चास मिळावें. ( ३ ) बऱ्हाड, खानदेश, औरंगाबाद व विजापूर या सुभ्यांत मिळून पंडित प्रधानांस पन्नास लाखांची जागीर मिळावी. ( ४ ) गुजरजवळील शिवनेर व चाकण हे किल्ले पंडित प्रधानांस मिळावे. ( ५ ) दक्षिणेच्या सहा सुभ्यांच्या देशपांडेगिरीच्या शेकडा पाच इतक्या मिळकतीचें वतन पंडित प्रधान यांस मुकरर व्हावें. ( ६ ) वतनी व मुकासे या नात्यानें चालू असलेले कित्येक गाव इनाम व अल्तमघा म्हणून पंडित प्रधानांस व्हावे. ( ७ ) दक्षिणेच्या कामांचा बंदोबस्त पंडित प्रधानांच्या मदतीनें व सल्ल्यानें करावा; इतर कोणास दखल होऊं देऊं नये.

---

मिल्हेन १३ } १४ { श. १६६० फाल्गुन वद्य १<br>इ. १७३९ मार्च ११

? → बाजीराव पंडित प्रधान

फार दिवसांत आपलें कृपापत्र येऊन मनास सुख न झालें. तरी कुशल वृत्त नेहमीं येत जावें. पादशाह व इराणचा मलिक नादिरशाह यांच्या लढाईची हकीकत आणि लढाईत अमीरुल उमरा, त्यांच्या संगानीं असलेले त्यांचे भाऊ, मुलगे व इतर उमराव यांचें ठार होणें हें आपणांस समजलें असेल. वकीलाच्या लिहिण्यावरून समजलें कीं, नबाब ठार झाल्यावर लढाईत जखमी होऊन त्या तर्फेच्या लोकांचे हातीं लागलेला बुर्हानुलमुल्क याच्या मार्फतीनें आसफजाहि बहादुरानें तंटा मिटविण्याच्या दृष्टीनें नादिरशाहाची मुलाखत घेतली व याच सनाच्या तारीख २० जिल्काद रोजीं हजरतांस नादिरशाहाच्या डेऱ्यास नेलें. नादिरशाहानें स्वागताचे विधि यथायोग्य पद्धतीनें करून आपल्या मसनदीवर बसविलें व एकेच ठिकाणीं खानापिना फर्माऊन हजरतांना परत आपल्या डेऱ्यास जाण्याची परवानगी दिली. दोघांत करार ठरला कीं, नादिरशाहानें दुसरे दिवशीं हजरतांच्या डेऱ्यास जावें, करारप्रमाणें विदा होऊन स्वदेशीं परतावें आणि हजरतांनीं दिल्लीस जावें. अशा तऱ्हेनें २–३ दिवस जाबसाल चालू होते. ता. २४ ला नादिरशाहानें आसफजाहास बोलावून घेतलें, जाबसाल करण्यासाठीं ता. २८ पर्यंत आपल्या लष्करांत ठेविलें आणि म्हणाला कीं, अस्वस्थ प्रकृतीमुळें मी बादशाहांकडे जाऊं शकत नाहीं. त्यांनींच इकडे येऊन

मला निरोप द्यावा. तेव्हां आसफजाहानें नादिरशाहाचें मानस बादशाहास कळविलें. बादशहा कौल-कराराच्या आशेनें ता. २७ रोजीं दोन्ही लष्करांच्या दरम्यान डेरा उभा करून सडा नादिरशाहाकडे गेला. बादशाह येत आहे असें ऐकतांच नादिरशाहानें किझलबाशांची फौज नेमून तीस बुर्‍हानुल्मुल्क व अजीमुल्लाहखान यांसह बादशाह, खान दौरान व इतर उमराव यांची मालमत्ता व कारखाने जप्त करण्यासाठीं व किल्ल्यांत जुलूसाची तयारी करण्यासाठीं शाहजहानाबादेस पाठविलें. दुसरी फौज बादशाहास घेऊन गेली. तेव्हां पादशाही फौज जागोजाग पळून गेली. दोन्ही उमरावांनीं पाच हजार किझिलबाशांसह ता. २९ रोजीं शाहजहानाबादेंत दाखल होऊन तेथें नादिरशाहाची द्वाही फिरविली. ता. १३ जिल्हेजपर्यंत येवढी बातमी मिळाली. पुढें समजेल ती लिहिण्यांत येईल.

---

| | | |
|---|---|---|
| मुहम्मदशाहाचा<br>जु. २२ शव्वाल १ | १५ | श. १६६१ पौष शुद्ध २<br>इ. १७३९ डिसेंबर २१ |

सध्या कांहीं जरूरीच्या कामाचा निकाल करण्यासाठीं वकील धोंडो पंडिताबरोबर मला आपणांकडे पाठविलें आहे. म्हणून ता. १ शव्वाल सन २२ जुलूस रोजीं त्या बाजूस प्रस्थान करणार आहों. आपलें दर्शन होऊन मुलाखत व्हावी अशी फार वासना आहे. परमेश्वरी इच्छा असेल तर तसें लवकरच होईल. दरबारची सर्व तपशीलवार हकीकत पंडिताच्या लिहिण्यावरून व्यक्त होईल. मला आपला जीवश्चकंठश्च मित्र समजून आपलें कुशल लिहीत असावें. अधिक काय लिहिणें.

---

| | |
|---|---|
| १६<br>नकल | श १६६२ पौष शुद्ध १० पूर्वी<br>इ १७४० डिसेंबर १७ पूर्वी |

बाळाजीराव पंडित प्रधान व चिमणाजीराव यांनीं केलेला करार असा कीं, माळव्याच्या सुभेदारीची आम्हांवर कृपा होत असल्यानें आम्ही पुढीलप्रमाणें सेवा करूं. (१) हुजूरच्या भेटीस येऊं. (२) माळवा सुभ्याशिवाय इतर कोठेंही दखल-ढवळाढवळ करणार नाहीं. ( ३ ) इतर कोणीही मराठा सरदार नर्मदेचे घाट उतरून हिंदुस्थानच्या सुभ्यांत शिरणार नाहीं. त्याची जिम्मे आम्हांवर आहे. ( ४ ) एक मातबर मराठा सरदार पांचशे स्वारांसह हमेशा हुजूरच्या

चाकरीस राहील. ( ५ ) इनाम म्हणून या साली जें द्रव्य मिळणार त्याहून अधिक एकही दाम यापुढें सरकारकडून मागणार नाहीं आणि सेवेंत कायम राहूं. ( ६ ) बादशाही फौज त्या प्रांतीं बाहेर पडेल तेव्हां चार हजार मराठे स्वारांसह हजर होऊन सेवा व प्राणार्पण करूं. याशिवाय हुजूरकडून मराठी स्वारांची मागणी आल्यास हुजूर असे तोंपर्यंतचाच रोजमरा मागूं. ( ७ ) चंबळेच्या पलीकडील जमीदारांकडून ठरलेल्या पेशकशीहून अधिक एका दामाचीही मागणी करणार नाहीं. ( ८ ) त्या प्रांतांतील लहान मोठ्या जमीदारांना तंबी देण्याविषयीं हुजूरकडून हुकूम होईल तर चार हजारपर्यंत स्वारांच्या मदतीनें बनेल तशी त्यांस तंबी देण्याचा प्रयत्न करूं. ( ९ ) किल्लेदारांच्या जागीरी, काजी, मुफ्ती वगैरे धार्मिक मनुष्यांच्या शर्ती व निर्वाहासाठीं त्यांस दिलेल्या जमिनी, रोजनदारांचे रोजमरे व इनामें, फर्मानांचे पुरावे असतील त्याप्रमाणें चालविण्यांत अडथळा न आणितां त्यांच्या ताब्यांत देऊं-म्हणजे ते कल्याण चिंतून राहतील.

---

} १७ { श. १६६१ चैत्र शुद्ध ७ नंतर
इ. १७४१ मार्च १२ नंतर

? → बाजीराव

आपलें विश्वासाचें पत्र—ज्यांत पुण्याहून निघणें, आसफजाहापाशीं पोहोचणें, निजामुद्दौल्याच्या प्रकरणाचा निकाल झाल्यावर निरोप घेऊन नर्मदा उतरणें, गौरशावर येथें पोचल्यावर कूचावर कूच करून पुढें रवाना होणें आणि बाबूरावास हुजूर धाडणें हे विषय होते—पावलें. आशय समजला. आपले अर्ज व लेख हुजूर असलेल्या आपल्या वकिलांनीं दिलेले लेख, त्याचप्रमाणें पंडित प्रधानांनीं आपल्या अल्प्या आयुष्यांत गेल्याच वर्षी केलेल्या विनंतिरूप मागण्या यांचा विचार झाला. त्या मागण्यांबाबत आपल्यावर आपल्या इच्छेप्रमाणें कृपा झाली. आतां त्यांनीं या प्रेमाबद्दल आभारी होऊन सेवेंत प्राणार्पण करण्याची कमर बांधून शीघ्र महाराजाधिराजांजवळ पोचावें. कराराप्रमाणें हुजूरच्या भेटीस यावें आणि अशी चाकरी करावी कीं, आपल्या दहशतीनें चोर, होईल बंडखोरांची देशांतून हकलपट्टी होऊन प्रजा सुरक्षित व्हावी. माझा शब्द व आपलें नांव यांस शोभा यावी. बाबूराव शीघ्र हुजूरच्या सेवेंत येऊन मागण्यांवर सरगरम राहील अशी ताकीद व्हावी. बाकी हकिकती राव किरपारामाच्या लिहिण्यावरून समजतील.

---

मुहम्मदशाहाचा जु. २३ रवल ७ } १८ { श. १६६३ ज्येष्ठ शुद्ध ९ इ. १७४१ मे १२

आसफजाहाच्या मध्यस्थीनें मी बाळाजी बाजीराव मुख्य प्रधान महाराजाधिराज, समसामुद्दौला, अजमखान व मुहम्मद सईदखान यांच्या समक्ष ता. ७ रबिलावल जुलूस सन २३ रोजीं खालीं दिल्याप्रमाणें करारनामा लिहून देत आहे. मजवर जागीरी व फौजदारी यांसह आणि वालागुहर पादशाहजादा याच्या नायबीसह माळव्याच्या सुभेदारीची कृपा झाली आहे. तेव्हां कबूल करतों कीं, तेथें माझा अमल चालू करीन. चंबळा व यमुना या नद्यांच्या पलिकडच्या तीरावरील राजांकडून पूर्वीपासून जो पैसा घेत आलों आहे तो छत्रसालाच्या मुलांवर नजर देऊन .............. ज्याचा या नोकरीशीं संबंध आहे तो राजा अयामलच्या सल्ल्यानें घेत जाईन. याशिवाय दुआबांतील मसना ? व पराग इत्यादि दुसऱ्या मुलखांत दखल करणार नाहीं. येत्या वर्षी महाराजाधिराजांबरोबर हजरतांच्या सेवेस-भेटीस येईन. हुजूरकडून दरोबस्त माळव्याची आणि चंबळा व यमुना यांच्या सुभेदारीची नायबी या चाकराशीं संबद्ध केली गेली असल्यानें दुसऱ्या कोणा मराठ्यास नर्मदा उतरून पादशाही मुलखांत येऊं देणार नाहीं. मातबर वकीलास पांचशे स्वारांसह हुजूर ठेवीन. हुजूरकडून पंधरा लाख रुपये इनाम म्हणून या सेवकास मिळाले. यापुढें एक दामही अधिक मागणार नाहीं आणि सेवेंत दृढ राहीन. बादशाही कामासाठीं केव्हांही बोलाविल्यास चार हजार स्वारांसह येऊन कामाचा मनाजोगा निकाल केला जाईल. बारा हजार स्वार पाठविले तर चार हजारांचा खर्च मागणार नाहीं. बाकी आठ हजार स्वारांचा खर्च रोजमऱ्याच्या हिशेबानें घेऊन काम निकालांत काढीन. फौजदारी, जागीरी व किल्ले यांसह दरोबस्त माळव्याच्या सुभेदारीच्या नायबीची सनद सहा महिन्यांत मिळावी आणि चंबळा व यमुना यांच्या अलीकडच्या बाजूच्या राजांकडून पेशकश घेण्याच्या सनदेचीही कृपा व्हावी. ता. उपर्युक्त.

---

मुहम्मदशाहाचा जु. २३ रवल ७ } १९ { श १६६१ ज्येष्ठ शुद्ध ९ इ १७४१ मे १२

आम्ही राणोजी शिंदे, मल्हारजी होळकर, यशवंतराव पवार व पिलाजी जाधव लिहून देतों कीं, बाळाजीराव मुख्य प्रधान हुजूरची चाकरी कबूल करून

नंतर चाकरींत विरुद्धता आणतील तर आम्ही त्यांस विनंति करून उलटें देणार नाहीं. त्यांतूनही त्यांचें डोकें फिरलेंच तर पंडित प्रधानांची नोकरी सोडूं. येवढ्यासाठीं हे चार शब्द लिहून दिले आहेत. ता. ७ रवल सन २३ [जु.*]

---

| | | |
|---|---|---|
| मुहम्मदशाहाचा<br>जु. २३ रवल १३ | २० | श. १६६३ ज्येष्ठ शुद्ध १४<br>इ. १७४१ मे १८ |

मी बाळाजी बाजीराव मुख्य प्रधान करार करतो कीं, हुजूरच्या मर्जीखेरीज आसफजाह वगैरेंशीं विश्वासाचीं कामें करणार नाहीं. यासाठीं हे चार शब्द लिहून देत आहे. ता. १२ रवल सन २३ [जु.*]

---

| | | |
|---|---|---|
| मुहम्मदशाहाचा<br>जु. २४ रजब १७ | २१ | श. १६६३ भाद्रपद वद्य ४<br>इ. १७४१ सप्टेंबर १७ |

कमरुद्दीनखान → बाळाजी बाजीराव

उच्च हुकुमाप्रमाणें दरोबस्त माळव्याची सुभेदारी व फौजदाऱ्या ... सरकारी प्रतिनिधीकडे व नायबी तुम्हाकडे मुकरर झाली. या बद्दलचे धन्यवादांत प्रगति करून शहरें व मुख्य ठिकाणें यांचें रक्षण, बंडखोरांचें समूळ उच्चाटन आणि मार्गांचें संरक्षण या गोष्टी करारास उचित अशा पद्धतीनें करीत जाव्या आणि असा वचक बसवावा कीं कोणीही दाणगट अशक्तावर हात उगारणार नाहीं. याविषयीं पक्की ताकीद समजावी. ता. १७ रजब सन २४ [ जुलूस*

---

| | | |
|---|---|---|
| | २२ | श.<br>इ. |

?→ बाळाजी बाजीराव

तुमचा अर्ज महादेव पंडितानें असदयारखानाच्या मध्यस्थीनें हुजूरास पोचविला. त्यांत स्वतःचे प्रामाणिक निष्ठेचा चांगुलपणा लिहिला होता तो पसंत पडला. तुमच्या चाकरीवर अतिशय विश्वास आहे. तुमच्यावर प्रतिदिनीं वाढती कृपा आहे असें समजून अधिकाधिक चाकरी करावी व कृपा प्राप्त करून घ्यावी. यामुळें तुम्हीं व धोंडोपंत यांच्याकरर चांगला परिणाम होईल अर्जांत आणखी जें कांहीं लिहिलें होतें, त्याविषयीं असदयारखान व महादेवपंडित यांच्या लिहिण्यावरून कळून येईल. मन बादशाही कृपेनें संतुष्ट ठेवावें.

---

मुहम्मदशाहाचा } २३ { श १६६४ आषाढ वद्य ५
जु. २५ जवल१९ } { इ. १७४२ जुलै ११

?→ बाळाजी बाजीराव

उरलेलें आयुष्य चाकरीच्या प्रगतींत घालवून उचित चाकरी व मनपसंत उपाययोजना या योगें उत्तरोत्तर कृपापात्र व्हावें अशी इच्छा व्यक्त करणारी आणि या सालीं शत्रूची वाट बंद झाल्यामुळें तो आसमंतांतून बाहेर आला नाहीं अशा मजकुराची अर्जदास्त पावली. त्यांतील निष्ठेचा तपशील सांगणारी हकीकत कळून आली. तुम्हांवर खूप कृपा व स्तुति यांचा वर्षाव झाला. कृपेचें निदर्शन म्हणून खासा पोशाख, सिरपेच, घोडा, हत्ती या वस्तु भेट दिल्या. आश्चर्य हें आहे कीं, बंगाल्याचा सुभेदार फौजेच्या जबाबदारींतून बाहेर पडूं शकला नाहीं. त्यामुळें झालें तें असें–तुम्ही रघूजीस तंबी देण्यासाठीं मार्ग निरोविल्यामुळें त्या जिल्ह्यांत वर्दळ होईल असें अलीवर्दीखानास कळविलें. त्यानें त्या जिल्ह्याची काळजी न करितो ओडिसा सुभ्याची व्यवस्था करण्यासाठीं जमविलेली फौज जागोजाग पाठविली, इतक्यांत शत्रुसैन्य आलें. त्यानें हातपाय झाडण्यास कमी केलें नाहीं तरी, खानाची फौज कमी असतांही तो तंबी देण्यांत गढून गेला. शेवट ती सेना हेतु साध्य न होतांच परत फिरली. यापुढें शत्रू पुन्हा चढाईचा विचार करील तर (आमचे) लष्करी त्यास सजा देतील. त्या चाकरानेंही चाकरीचा चांगुलपणा व कराराचा कायमपणा यांवर दृष्टी ठेवून त्या दांडग्याचा मार्ग बंद करण्याचा प्रयत्न करावा आणि त्याच्या टोळीपैकीं कोणासही पादशाही मुलखांत येऊं देऊं नये. हें कृत्य अस्मादिकांस फार पसंत पडेल. शिवाय अर्ज आला होता कीं, आजवर येथें होतों; आतां दक्षिणेस जातों. ज्या कामाचा हुकूम होईल तें शक्त्यनुसार प्रगत करीन. तो चाकर अवश्य तसें करील ही खात्री आहे. त्यानें तसें करावें म्हणजे तो पादशाही कृपेस पात्र होईल. महादेव पंडितास मुखवचनें करून सांगितलें होतें त्याचा जाब काय झाला तें महादेव पंडित हजर होता म्हणून जाणतो. तसेंच कमरुद्दीनखान व महादेव पंडित यांच्या लिहिण्यावरूनही तें ध्यानांत येईल. ता. १९ जवल २५[ जु. * ]

---

} २४ { श. १६६४ आश्विन वद्य ११
{ इ. १७४२ आक्टोबर १५ सुमार

महादेव पंडित यांवर पादशाही कृपा होवो. आपलें पत्र पावलें व समाधान झालें. आपण पादशाही हुकुमाप्रमाणें बाळाजीराव यांस बंगाल्याकडे मराठ्यां-(विरुद्ध) मोहिमेंत मदत करण्यासाठीं पाठविण्याकरितां सतार्इ अल्पपुरास

गेला व राजासाहिबांची भेट घेतली. त्यांनीं राजा अयामल यांस उपर्युक्त पंडितां-( प्रधानां ) कडे पाठविलें. त्यांनीं सिरोंजपावेतों जाऊन व मुलाखत घेऊन इकडे रवाना होण्याविषयीं तयार केलें. हें सर्व राजा अयामल यांच्या लिहिण्यावरून समजलें व समाधान झालें. या गरीबानें परमेश्वर व पादशाह यांच्या कृपेनें व दैवानें भास्कर मकहूर यास, कटक्याहून पचेत, तेथून मेदिनीपूर, तेथून कटक, तेथून अथरपूर खुर्दा एथवर पाठलाग करून व मारमारून बंगाला व ओडीसा या सुभ्यांतून बाहेर काढिलें. तेव्हां तो संबलपुरावरून गेला. वाटेंत कांहीं लढाया झाल्या त्यांत तरि, तुफंग वगैरेंनीं त्यास असा मार दिला कीं, प्रत्येकींत शत्रूचे पुष्कळ लोक मेले. त्यांना गाडून उभे राहण्याचें सामर्थ्य न राहिल्यानें त्यांचे मोंहावर मोड होऊन ते कोल्ह्याप्रमाणें पळून गेले. सध्या हा क्षुद्र मुर्शिदाबादेस जात आहे. पादशाहास भास्कर व रघुई भोसले यांचा नाश व तंबी मन्जूर आहे आणि भास्कर इकडून सहीसलामत पळून जात आहे. तेव्हां आपण पंडितां( प्रधानां )स तपशीलवार निवेदन करून त्यांस त्याच रस्त्यानें देवगड चांदाकडे जाऊन भास्करास योग्य तंबी देऊन नागज करण्याविषयीं आणि रघुई या भागांत धुंद करण्यासाठीं येईल तर त्याचा मार्गही निरोधण्याविषयीं तयार करावे म्हणजे पादशाही मुलूख या लोकांच्या संकटांतून बचावेल आणि बादशाहास मजा पडेल. बहुत काय लिहिणें.

---

## २ संकीर्ण पत्रें

| | | |
|---|---|---|
| मु. ९५४, हि. ११६१ }<br>शव्वाल १० } | २५ | { श १७७६ भाद्रपद शुद्ध १२<br>{ इ. १५५४ सप्टेंबर ८ |

[ आरंभीं फार्सी मजकूर, ५ शिक्के आणि उजवे बाजूस समासांत 'सुरू लिगोजी,' 'सिकेदर खसा,' असे शेरे व दुसऱ्या शेऱ्यावर कट्यारीचें चित्र* ]

सुरू सुद्द विठल चंदरम देसाई

माहद्दीनमा भासती जमीनु माजरू का विजापुरू कर्नाड इनमा बाग सेख सिलेमा इनम दर बिा मिया सेकदर खावस व सैद मुसेना लष्करी खा येस्तयारन मुलुकी व कानूजी साहेबू हवल व लिगोजी व तिमारस पडिता बिरनाहळी व बुलगोड मोकदमा व कमीसेठी मोकदम व माल्गोड व बसेटी हतगोंटे व तिमारस सुरप कुळकरणी व समस्ता प्रज'काा माजकूर सुा अर्बा हमासीना तिस मया गाजा सर्रे हाकिमा सारे छ १० माहे सोवन सन इदे

समासीना बिघे ६२८४ दर चावरसी बिघे १२० येकचीला मळक अऊने मळक येल्तर मुलक वाहिलमी गजी———॥२८४

| | | | |
|---|---|---|---|
| तुल | ८॥४ | अर्ज | ६॥४ |
| पस्छिमा | ९८३ | दाछणा | ७।१ |
| पुर्वा | ८॥। | उतर | ६॥२ |

[ चार नांगरांचीं चित्रें* ]

---

हि. ९६२ रमजान २२ } २६ { श. १४७७ श्रावण वद्य ८ / इ. १५५५ आगस्ट १०

आमचेकडे अर्ज आला कीं, ¦पूर्वीच्या सुलतानांच्या सनदाप्रमाणें माळवा सुभ्यास जोडलेल्या सारंगपूर सरकारांतील मुहम्मदपूर ¦ ( महिदपूर ) परगण्याची चौधराई व कानूनगोई या सेवा, बन्जारी वगैरे आठ खेडीं, वसुलापैकीं शेकडा पाच रुपये, सायर उत्पन्नापैकीं आठवा हिस्सा, प्रत्येक गावामागें सालीना बारा रुपये रुसूम आणि उपर्युक्त कसब्यापैकीं एक हजार साठ बिघे जमीन, ¦येवढेंचीं वावी वेणीराम वलद जसराम याजकडे अल्तमघा जातीचें इनाम म्हणून वंशपरंपरेनें पूर्वीपासून मुक्रर आहे. आम्ही पूर्वीप्रमाणें कृपा करतों ( अल्तमघा म्हणून चालू ठेवितों ). तरी आमचीं मुलें, उमराव व विविध अधिकारी यांनीं वरील उत्पन्न अल्तमघा प्रकारचें इनाम म्हणून त्याजकडे वंशपरंपरेनें चालू ठेवावें. त्याजकडून अधिक उणें कांहींही घेऊं नये. केवळ जाबत्याप्रमाणें घेत जावें. त्यानेंही असा प्रयत्न करावा, रयतेस असें राजी व कृतज्ञ राखावें व शेती करावी कीं, सालोसाल वसूल वाढावा आणि तो वेळेवर वसूल करून अधिकाऱ्यांच्या अनुमतीनें खजिन्यांत दाखल करावा. रयतेचें कर्तव्य हें कीं, उपर्युक्त मनुष्यास उपर्युक्त परगण्याचा चौधरी व कानूनगो समजावें. प्रतिवर्षी नवीन सनद मागूं नये. ता. २२ रमजान सन ९६२ हि. आसफखानानें पाठविलें.

---

सु. १०४१ / हि १०५१ जवल३ } २७ / शि. { श. १५६३ श्रावण शुद्ध ५ / इ. १६४१ आगस्ट १

मुहम्मद आदिलशाह → मिर्झा मुहम्मद रिजा हवालेदार मामले गोवें

एव्हां आम्हांस समजलें कीं, (१) रणदूलहखानानें सरकारसाठीं एक जहाज तयार केलें असून तें बंदरोबंदरीं पाठवावें अशी त्याची इच्छा आहे. पण रेवदं-

ह्याचा कप्तान कांहीं तरी सबब पुढें करून करारमदारांविरुद्ध जावें असें इच्छितो; येवढेंच नव्हे तर नुकसान पोंचवूं इच्छितो. गोर्वे बेटाचा विजुरई (व्हाइसरॉय) [आमच्याशीं] दोस्ती ठेवितो. तेव्हां ह्या गोष्टीचा त्याशीं संदर्भ लावून त्यास समजवावें कीं, दुर्दैवानें उपर्युक्त खानाच्या जहाजास थोडासाही अडथळा पोंचला तर खात्री असूं द्यावी कीं, एका क्षणांत गोर्वें बरबाद होईल. कारण लश्कराची जय्यत तयारी आहे आणि त्या खानाची राज्याविषयीं सदिच्छा आमच्या पसंतीस आली आहे. त्याच्या मनोवृत्तीचें रक्षण करणें जरूर आहे. सारांश त्यानें ताकीद करावी कीं, त्यानें (व्हाइसरायानें) जलदीनें कप्तानाच्या नांवें लिहून पाठवावें कीं, उपर्युक्त खानाचें जहाज रवाना करण्यांत थोडासाही अडथळा करूं नये. उलट मदत करण्यांत क्षणाचाही विलंब लावूं नये. आभार व तक्रार फार परिणामकारी आहेत असें समजावें. (२) दुसरें असें कीं, उपर्युक्त खानानें सरकारसाठीं सहा घोडे आणविले आहेत. उपर्युक्त कप्तान जकातीसाठीं दांडगाई करीत आहे. पूर्वी हुकूम केला होता कीं, सरकारमार्फीच्या पंचवीस घोड्यांमधून हे वजा करावे व दांडगाई करूं नये. पण तो सबब पुढें करतो कीं, हे दाभोळला आणले असते तर मंजूर होतें, इतरत्र नाहीं. याचा अर्थ काय? दाभोळ, राजापूर किंवा खुद्द गोर्वें कोठेंही सरकारसाठीं घोडे खरेदी केले तरी जकातीची माफी आहे. अशा परिस्थितींत उपर्युक्त कप्तान अस्थानी सबबी पुढें करून दंगा माजवावा असें इच्छितो. पण खात्री असावी कीं, हा दंगा त्याच्या कुलासच खराब करणारा आहे. तेव्हां जरूर आहे कीं, याबाबतहीं त्यानें संदर्भ लावून ताकीद लिहवावी कीं, यापुढें अस्थानी मागणी करूं नये. (३) तिसरें असें कीं, उपर्युक्त कप्तान पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें अठावीस हजार लारींसाठीं दांडगाई करीत आहे. पूर्वी हें बंदर दुसऱ्याचें ताब्यांत होतें. हल्लीं आमच्या ताब्यांत आहे. आतां त्या लारींची मागणी कशी करतो? याविषयींहि व्हाइसरायशीं संदर्भ लाऊन कप्तानास ताकीद आणवावी कीं, यापुढें कोणत्याही तऱ्हेनें मागणी करूं नये. (४) चौथें असें कीं, सौदागरांपासून दर शेकडा एक लारी स्वतःची जकात म्हणून घेत असत. आतां त्यांजकडून शेकडा दहा लारी मागत आहेत. यामुळें बंदराची खराबी होत आहे. याबद्दलही संदर्भ लावावा कीं, नेहमीं चालू असेल तेंच घ्यावें. अधिक घेऊं नये. ताकीद जाणावी. ता. २ जमादिलावल सन

हि. १०५८ रबा } २८ { श. १५७० पेशास / इ. १६४८ एप्रिल १५ ते मे १४

मुहम्मद आदिलशाह → आका इमाम कुली हवालदार व कारकून परगणे कुंदाल ( कुडाळ )

कृष्णाजी लखमरस यानें विनंति केली कीं, बंदर अमीन मौजे वेंगुर्ले येथील बंदरनवीसी, उरी व दलाली यांची मिरास पूर्वीपासून माझी असून नबाब (खान बाबा मुस्तफाखान ) यांनीं मला दिलेली आहे आणि त्यांच्या खुर्दखता-प्रमाणें मजकडे चालू आहे. ती चालू ठेवण्याविषयीं फर्मान व्हावें. तरी वरील मिरास उपर्युक्त नबाबाच्या खुर्दखताप्रमाणें कृष्णाजी लखमरस याजकडे दिली आहे. चालू ठेवावी. बंदरनवीसीचा मुशाहिरा दरमहा चार होन आणि उरी व दलाली यांचे हक्कलवाजिमे त्यास देत जावे आणि वंशपरंपरेने मिरास चालू ठेवावी. ता... रबिलाखर हि. १०५८

---

औरंगजेबाचा जु. ४९ जिल्काद ९ } २९ { श. १६२६ फाल्गुन शुद्ध १० / इ. १७०५ फेब्रुवारी २२

स्मरण असें कीं, ता. २७ रमजान सन ४८ जुलूस रोजीं नेमा नांवाचा दखनच्या शत्रूचा सरदार सुमारें पन्नास हजार स्वार व अगणित प्यादे घेऊन आला आणि त्यानें जहानाबाद उर्फ डुराहा या गावास वेढा घातला. तेथील फौजदारास कैद करून व गावास आग लावून घर नि घर उद्ध्वस्त केलें. कोणाही मनुष्याजवळ अंगावरच्या वस्त्राखेरीज कांहीं ठेविलें नाहीं. नगद व जिन्नस अशी सर्व मालमत्ता विशेषत: काजी इनायतुल्लाह याच्या शिक्क्याची आणि पुढें दिलेल्या तपशीलाप्रमाणें अलेभान, चतुर्भुज व इतर चौधरींच्या वाटणीविषयींची सनद त्या प्रसंगीं लुटली गेली. याच्या सत्यतेबद्दल ज्यास माहिती असेल त्यानें परमेश्वरासाठीं तरी पुरावा द्यावा. [ कित्येक गावांचीं नावें* ] ता. ९ जिल्काद सन ४५ जुलूस [ आलमगीरी* ]

---

रमजान ३ शनि. } ३० { श. १६४६ ज्येष्ठ शुद्ध ५ / इ. १७२४ मे १६

आपल्या पत्राचा जाब पूर्वींच पाठविला आहे. पावला असेल. ता. १ रमजानला फर्खुन्दह बुनियादच्या ( हैदराबाद ) जवळून कूच करून हुसेनसागर

(हैद्राबादजवळ )वर मुक्काम केला आहे. उद्यां ता. ४ रविवार रोजी ›
हलून कूचावर कूच करीत सुजस्ते बुनियाद (औरंगाबाद) कडे जाण्य
इरादा आहे. तुम्ही तातडतोब इकडे यावें आणि गंगाकिनारीं भेट घ्यावी.

---

मुहम्मदशाहाचा } ३१ { श १६४६ आषाढ वद्य
जु. ६ शव्वाल २६ } { इ. १७२४ जुलै ७

विजयी फौज नांदेडवरून बीडकडे जात आहे. अजून तुम्ही आ
नाहीं. तुमच्या नावाचा बादशाही फर्मान आला आहे. पावती पाहल्यास पाठवू
देतों. नाहीं तर हुजूरकडे परत केला जाईल. उत्तर यावें. ता. २६ शव्वा
जुलूस सन ६.

---

मुहम्मदशाहाचा } ३२ { श. १६४६ भाद्रपद शुद्ध १
जु. ६ जिल्हेज ९ } { इ. १७२४ आगस्ट १८

यापूर्वी आपणांसही पत्रें गेलीं होतीं कीं, हुजूरच्या हुकुमाप्रमाणें
विजयी फौजेंत येऊन दाखल व्हावें व पादशाही कामावर रुजू व्हावें. जिल्काद
महिन्याच्या अखेरच्या तारखेस उपर्युक्त हुकुमानुसार समसामुद्दौल्याचे
शिक्याच्या पत्रानें ही गोष्ट आपणांस कळविली. आतां आपल्या नांवें फर्मान
मागविला होता तो आला आहे. आपणाकडे पाठविला आहे. घ्यावा. त्याचें
स्वागत करून त्याप्रमाणें वागावें. पादशाही नोकरांचा कमाल दस्तूर हा आहे
कीं, पादशाहास आपण ठाऊक व्हावें. आपण तसें करावें या बुद्धीनें पादशाही
फर्मान मागविला होता. त्या कृपेचें योग्य प्रकारें आभारी होऊन, जमेल त्या
उपायानें विजयी फौजेंत दाखल व्हावें. बंडखोरांची मैत्री करणें कोणत्याही
दृष्टीनें योग्य नव्हे. याबाबत हेळसांड झाल्यास सर्व बाजूंनीं एकाच प्रकारच्या
बातम्या हुजुरास जातील. मग आमच्यानें पादशाही कृपा करविणें होणार नाहीं.
तेव्हां आपलाही उपाय व प्रयत्न चालणार नाहीं. पश्चात्ताप फायदेशीर नसतो.
दुरदेशीनें विचार करून काय तें करावें. ता. ९ जिल्हेज जु. सन ६

---

मुहम्मदशाहाचा } ३३ { श १६५० श्रावण वद्य ५
जु. १० मोहरम १८ } { इ १७२८ आगस्ट ११

सिन्नर येथें पोंचणें व वाटेंत मल्हार नावाच्या शत्रुसरदाराचा मोड करून
त्यास पांगविणें या तपशीलाची अर्जी पावली. केसू व त्याचे भाऊ हे तुमच्या

महाराचे नायब असून सरकारी वसुलाच्या जावसालांत आहेत. त्यांनीं जो पैका पाठविला तो पावला. ते आपल्यां घरीं पोचले व शत्रूनें हार खाल्ली हें ठीक झालें. केसु वगैरेशीं हिशेबाचे जावसाल करून हिशेबीं असेल ते द्यावें. वायदाप्रमाणें पैसा व त्यांस पाठवून द्यावें.

---

| | | |
|---|---|---|
| दुसऱ्या आलमगीरचा जु. ६ जिल्काद ६ | ३४ | श. १६८१ आषाढ शुद्ध ८ इ. १७५९ जुलै २ |

? → रावसाहेब यांसी

शाहझादा मुहम्मद आली गौहर बादशाही मर्जीविरुद्ध अजीमाबादेस (पटणा) येणार असल्याचें आपणांस समजलें असेलच. यामुळें बिहार सुभ्याची सुभेदारी त्याजकडून दूर करून मुहम्मद हिदायत बक्ष याजकडे दिली व तिचें प्रतिनिधित्व (नियाबती) या कल्याणेच्छूकडे आहे. तसेंच खाशांनीं पत्र पाठविलें आहे कीं, मुहम्मद आली गौहर मूर्खपणाच्या हेतूनें तिकडे गेला आहे. आतां त्याजकडे सुभेदारी राहिली नसल्यानें तो तिकडे जात असल्यास त्यास आडवावें आणि बनेल त्या उपायानें त्यास दस्तगीर करून हुजूरकडे पाठवावें. या पत्रांच्या नकला त्याजकडे पाठविल्या होत्या; पण कांहीं फायदा झाला नाहीं. तेथील नायब रामनारायण बहादुर याशीं त्यानें जोरानें युद्ध केलें. उपर्युक्तानें निरुपाय होऊन किल्ला बंद केला व त्याच्या रक्षणासाठीं किल्लेदारानें जें कांहीं करावयास पाहिजे होतें तें केलें. ११ दिवसपर्यंत तिकडून हल्ले केले गेले व इकडून त्यांचा प्रतिकार करण्यांत कसूर झाली नाहीं. बारावे दिवशीं किल्ला घेण्याचा बराच प्रयत्न केल्यावरही तें काम शक्तीबाहेरचें वाटून व आपले बरेच लोक मेले मात्र हें ध्यानांत घेऊन शाहझाद्यानें पाय काढला. आतां बादशाही हुकुमाप्रमाणें त्यास दस्तगीर करण्याच्या हेतूनें खान नासिरुल्मुल्क बहादुर, नबाब तानजन्ग बहादुर व महाराजा रामनारायण बहादुर हे फौजेसह पाठलाग करीत जात आहेत. सरहद्दीच्या आंतच हातीं लागावा असा ते प्रयत्न करतील. ता. ६ जिल्काद जु.६

---

| | | |
|---|---|---|
| दुसऱ्या शाह आलमचा जु. ३२, हि. १२०४ नंतर | ३५ | श. १७११ नंतर इ. १७८९ नंतर |

अहमदखान व नियाझबेग यांचें कुशल असो. राजश्री बापूजी मल्हार यास सहारणपूर, फैजाबाद हीं सरकारें व पानीपत, इत्यादि महाल यांच्या

व्यवस्थेसाठीं हुजुरून नेमिलें आहे. म्हणून लिहिलें जातें कीं, पूर्वोक्त दोघांनं जमेतीसह उत्तरोक्ताजवळ जाऊन त्याच्या सांगण्याप्रमाणें चाकरीच्या प्रगतींत गढून असावें, उत्तम चाकरीचें कार्य व्यक्त करावें व त्याशीं रुजू असावें. त्याज कडे हजर झाल्यापासून तनखा घेत जावा आणि पूर्वीच्या बाकीबद्दल त्याल तगादा लावूं नये. याविषयीं ताकीद जाणावी.

---

रमजान ११ नंतर } ३६ { श. १७१३ वैशाख शु. १२ नंतर / इ. १७९१ मे १५ नंतर

...किल्ले बंगलूर फत्ते केल्यावर पुरेसे स्वार जमा केले व नबाब आसफजाह यांच्या प्रतिनिधीची भेट झाली वगैरे हकीकत पूर्वीच आपल्या सेवेस सादर केली आहे. नंतर मी सीरनपतन (श्रीरंगपट्टण) किल्ल्याकडे निघालों. पण मी पोचण्यापूर्वीच शत्रूची फौज तेथें दाखल झाली आणि तिनें स्वतःच्या सुरक्षिततेची सर्व तजवीज करून किल्ला स्वतःच्या ताब्यांत घेतला. तो व बेट यांस स्वतःच्या पाठीशीं घालून ती उभी होती. मी कूच करून ता. ११ रमजान रोजीं तिजशीं लढाई दिली. परमेश्वरी कृपेनें तीस लढाईचा ताप सहन न होऊन तिचा मोड झाला व तेथून तिनें पाय काढून बेटाच्या उत्तरेस नवीन जागीं ठाण मांडलें. तेथेंही तीमधील पुष्कळ लोक मेले व जखमी झाले आणि चार तोफा व निशाणें आमच्या हस्तगत झालीं. नंतर या विश्वासू मनुष्याचा इरादा होता कीं, सीरनपतनला वेश घालावा. पण पाऊसकाळ सुरू होत असल्यानें आणि दाणावैरणीचा तुटवडा असल्यानें— याचा परिणाम तोफांच्या बैलावर इतका झाला आहे कीं—इच्छेप्रमाणें करण्याची उमेद राहिली नाहीं. गुरांचा रोग, पावसाचें आधिक्य आणि दाणावैरणीचा तुटवडा, यामुळें हजारों गुरें मेलीं. म्हणून हा विश्वासू पाऊसकाळ संपे तों थांबला आहे. या दिवसांत हरिपंत तात्या व परशुराम भाऊ यांची मुलाखत झाली. सध्या इंग्रज व पेशवे यांमध्येंही सलोखा असल्यानें हरिपंत तात्या व हा विश्वासू यांच्या विचारानें असें ठरलें कीं, वर्षाकाल संपेतों आपल्या फौजेनें बालाघाटावर मुक्काम करावा. तें आपल्या इभ्रतीस व शत्रूच्या भयास कारणीभूत होईल. दरम्यानच्या काळांत लढाईच्या सामानाची तरतूद करता येईल.......

---

# पत्रांवरील टीपा



१

एकमेकांस चिकटविलेल्या अनेक आदिलशाही फर्मानांच्या गुंडाळीपैकीं हें एक अपूर्ण पत्र आहे. हें शिवकालीन असूनही राजकारणी अर्थात् तत्कालीन समसुतीला अनुसरून नसल्या तरी महत्वाचें असल्यामुळें पेशवाई कागदांप्रमाणेंच अपुऱ्या कालनिर्देशाचें आहे. पेशवाईंत कोणत्याही प्रसंगाचे कागदपत्र शिवकालाच्या मानानें पुष्कळ अधिक मिळतात व त्यांत काळ-दृष्ट्या सुपरिचित अशा इतरही प्रसंगांचे उल्लेख येतात. यामुळें पेशवाई पत्रांचे काल ठरविणें थोडें सोपें असतें. अपुऱ्या कालनिर्देशाच्या शिवकालीन कागदांचे काल ठरविणें त्या मानानें अवघड जातें. कारण फार थोड्या शिवकालीन हालचाली व त्यांचे तपशील आज उपलब्ध आहेत. तारीख निश्चित करतां येईल असें गमक या पत्रात नाहीं; पण अंदाज करतां येतो तो असा– महाराज म्हणजे शहाजी व पाया (बाबा) साहेब म्हणजे खान बाबा उर्फ मुस्तफाखान असें गृहीत धरल्यास शहाजीस तंजावर येथें पाठविण्याबद्दलचा आग्रह आणि खान बाबा पोटाच्या दुखण्यानें आजारी असणें या दोन गोष्टी माझ्या मतें शहाजीच्या प्रसिद्ध कैदेपूर्वी थोडे दिवस होणें संभवतें. शहाजीस इ. १६४८ जुलै २५ रोजीं (श. १५७० श्रावण वद्य १, हि. १०५८ रजब १४) पकडलें आणि खान बाबा किंवा मुस्तफाखान इ. १६४८ नोव्हेंबर ९ रोजीं मरण पावला. तेव्हां हें पत्र इ. १६४८ जुलै २५ पूर्वीचें असावें असें मी समजतों. म्हणून या पत्रास जमादिलावल १६ ला जुळणारी इ. १६४८ जून २८ ही तारीख दिली आहे (शिश १४). या कागदांत आरंभींच विनंतिपत्र पाठविणाराचें नांव लखमाजी ज्योती असें आलें आहे. हा कोण होता त्याचा नीट पत्ता नाहीं. पण पेशवे दप्तरांत उपर्युक्त गुंडाळींत याच कागदाच्या जोडीनें एक आदिलशाही फर्मान आहे तें येथें कांहींसें उपयोगी पडण्यासारखें आहे. त्याची नक्कल मला मिळावी म्हणून ती मी इतर कागदांच्या नकलांबरोबरच मध्यभागाचे कमिशनर यांस हजर केली असता तिचा इतिहासांतील उपयोग ध्यानांत न आल्यानें आणि दुरुपयोगाचें भय वाटल्यानें त्यांनीं ती नक्कल मला देण्याची कृपा केली नाहीं. ॲलिएनेशन ऑफिसची ही पद्धत परिचित असल्यानें मी तिचें स्मरणानें टिपण करून ठेविलें होतें त्याचा येथें उपयोग करीत आहे. हा फर्मानाची तारीख हि. १०४७ जवल ७ (इ. १६३७ सप्टेंबर १६, श. १५५९ आश्विन शुद्ध ८) ही असून हें बहुधा मुस्तफाबाद (दाभोळ–रत्नागिरि) बंदराचा हवालदार मीर मुहम्मद याच्या नांवानें धाडलें आहे. यांत मीर सय्यिद मुहम्मद व सय्यिद अली अकबर यांनीं गैर समजूत करून दिली होती तरी लखमाजी ज्योती याच्या विनंतीवरून रामाजी ज्योती याचा वार्षिक तनखा पुन्हा पूर्वीप्रमाणें जाफराबाद मामल्यांतील

देवसणी, तार व कळंभत या गावांतून दिला जावा असा हुकूम आहे. रत्नागिरी जिल्ह्यांतील खेड हें तालुक्याचें ठिकाण आदिलशाही रियासतींत जाफराबाद मामल्याचें ठिकाण होतें. कळंभत हें गाव संगमेश्वर तालुक्यांतील सावर्डे पोस्टाखालीं आहे. तेव्हां हे दोन्ही गृहस्थ कोंकणांतीलच असावे आणि गमाजी हा लहमाजी (लक्ष्मणजी → लक्ष्माजी) चा धोरला भाऊ असावा. या पत्रांत आलेला महाराज शब्द शहाजीला अनुलक्षून आहे. इतर आदिलशाही फर्मानांतून तसे स्पष्ट निर्देश आले आहेत ( सह्याद्रि-मे १६४५ पृ. २६६-२६८). हें पत्र कोणास उद्देशून लिहिलें याचा नीट पत्ता लागत नाहीं. पण मुख्य पत्राच्या डोक्यावर पाया (बाबा) साहिब असा शब्द लिहिला आहे. तो बहुधा खान बाबा उर्फ मुस्तफाखान यास उद्देशून असावा. हा श. १५७०मध्यें शहाजीस पकडण्याचे वेळीं जिंजीच्या स्वारींत गुंतला होता. तेथेंच आजारी पडून मेला ( शि.च.वृ.सं. २१२,२८ ). या पत्रांत बाबासाहेबास कांहीं पोटाचा विकार होऊन आजारी असल्याचें नमूद आहे. शहाजीला कैद करण्यास जीं कारणें झालीं त्यांत ' चंदीस राचेवार मन्हारे होते ह्यांचा व महाराजाचा घरोबा आहे सामान पुरविताती ' हें कारण होतें ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. या पत्रांत तंजावरचा विजयराघव, मदुरेचा त्रिमलनायक व चंद्रगिरीचा किंवा वेलूरचा रायल यांवर शहाजीचें किती वजन होतें हें स्पष्ट सांगितलें आहे. तेव्हां या पत्रानें वरील गोष्टीचा पाठपुरावा होतो (शि. च. प्र. ४०). उपर्युक्त तंजावरचा नायक विजयराघव, मदुरेचा नायक तिरुमल व विजयनगरकरांचा अखेरी असेरीचा वंशज रायल ( ३ रा श्रीरंग ) यांचे सत्ताकाल अनुक्रमें इ. १६४०-१६७४, इ. १६२३-१६५९ व इ. १६४२-१६७० असे आहेत ( हिस्टॉरिकल इन्स्क्रिप्शन्स ऑफ सदर्न इंडिया पृ. ३६४,३६४,४०२ ). या तिघांपैकीं रायल हा पराक्रमानें नसला तरी विजयनगर सम्राटांचा वंशज असल्यानें मानानें थोर होता. यामुळेंच या पत्रांत दोघा नायकांनीं त्यास किंचित् मोठेपणा दिल्याचें दिसतें. या सुमारास रायलाची राजधानी वेलूर येथें होती आणि त्यावरूनच त्यास मुसलमानी साधनांत वेलूरचा रायल असें संबोधिल्याचें आढळतें ( शि. च. वृ. सं. २११५ ).

२

या पत्रांत उल्लेखिलेला मरहूम मुबारिझखान पहिल्या निजामाचा प्रतिस्पर्धी होय. दोघांची वऱ्हाडांतील साखरखेडलें ( सध्या बुलढाणा जिल्ह्यांतील फत्तेखर्डा किंवा फत्तेखेडलें) येथें इ. १७२४ सप्टेंबर ३० रोजीं लढाई होऊन तींत मुबारिझखान मारला गेला. तेव्हां हें पत्र या प्रसंगानंतरचें असलें पाहिजे. या लढाईच्या वेळीं मराठे सरदार मुख्य प्रधान १ ला बाजीराव यासह साखरखेडल्याच्या आसपास वावरत होते. एव्हां मुबारिझखान, मुघल बादशहानें नेमलेला दक्षिणचा अधिकृत सुभेदार असून बंडखोर बनलेल्या अर्थात् दक्षिणचा अनधिकृत सुभेदार १ ला निजाम यास शिक्षा करण्याचें काम त्याजवर सोपविलें होतें. येवढेंच नव्हे तर बादशहानें मराठी राज्याचा अधिकृत मुख्य शाहू यास

निजामाविरुद्ध मुबारिझखानास मदत करण्याविषयीं फर्मांविलें होतें (मराठी रियासत, नवी आवृत्ति, १ ला बाजीराव पृ. ५८). त्या प्रमाणें शाहूनें केलें कीं नाहीं ? शाहूनें आनंदराव सुमंतास औरंगाबादच्या मोगली अधिकारी ऐवजखान याकडे कशासाठीं पाठविलें (शारो ८) ? निजाम व बाजीराव यांच्या भेटींत काय ठरलें (पेद १७।२) ? शाहूनें कान्होजी भोसले यास निजाम व मुबारिझखान यांपैकीं कोणाकडेही न जाणें म्हणून पत्र लिहिलें तें कोणत्या धोरणानें (शारो १२) ? आणि उपर्युक्त दोघांच्या लढाईंत मराठ्यांपैकीं चाळीस जण जखमी झाले ते कोणातर्फे लढत असतां (पेद. १०।३११) ? इत्यादि अनेक प्रश्न या प्रकरणीं अनुत्पन्न आहेत. त्यांच्या उत्तराचा येथें फार संबंध नसला तरी या पत्राच्या भाषेवरून मराठ्यांनीं मुबारिझखानास करावयास पाहिजे तितकी मदत केली असतांही मुबारिझखान मारला जाऊन निजाम विजयी झाल्यामुळें मराठ्यांची सेवा सफळ झाली नाहीं, तथापि नव्यानें येणाऱ्या सुभेदारास मदत करण्याचें आश्वासन प्रतिनिधि देत आहे असें दिसतें. तें हा हें पत्र बादशहानें निजामास दक्षिणचा सुभेदार कबूल केलें (इ.१७२५ जून २०) त्यापूर्वी लिहिलें असावें (इर्विन २।१५२).

## ३

जुन्या फार्शी पत्रांविषयीं पुढील गोष्ट अवश्य लक्षांत ठेवण्यासारखी आहे. पत्राचें आवरण व वेष्टन यांवर सामान्यतः पत्रग्राहक व पत्रप्रेषक यांचीं नावें व पत्र पावल्याची तारीख येवढा तपशील असतो. पण या व पुढील कांहीं पत्रांचीं आवरणें व वेष्टनें दोन्ही नसल्यामुळें उपर्युक्त तपशील आपणास मिळूं शकत नाहीं. पण माझें अनुमान आहे कीं, हें पत्र बहुधा यादगारखानानें आणि कदाचित् खान दौराननें पहिल्या बाजीरावास लिहिलें असावें. पत्राच्या गर्भांत कालनिर्देश नाहीं आणि कालनिश्चय करण्यासारखें महत्त्वाचें गमकहि नाहीं. यामुळें या पत्राचा काल ठरविता आला नाहीं. पहिल्या बाजीरावाच्या कारकिर्दीच्या उत्तरार्धांत उत्तरेंतील राजकारणास रंग चढून तिकडील अनेक हिंदु राजेरजवाडे, मुसलमान सरदार, मुत्सद्दी व स्वतः मोगल बादशाह यांशीं वारंवार बोलणींचालणीं करण्याचा प्रसंग येऊं लागला. यासाठीं तिकडे ज्यांच्या ओळखीपाळखी होत्या किंवा ज्यांचे सोयरेधायरे किंवा इतर हितसंबंध होते असे लोक निवडून काढणें अवश्य होतें. यादवराव मुनशी, बाबाजी गणेश, धोंडो गोविंद, धोंडो महादेव, बापूराव मल्हार, महादेवभट हिंगणे हे त्यांपैकीं कांहीं जण होत. यांतील पहिल्या चौघांचे उत्तरेंत कोणत्या प्रकारचे हितसंबंध होते हें समजत नाहीं पण बापूराव मल्हार हा बाजीरावाचा मामा असल्यामुळें नात्याच्या जोरावरही त्यास उत्तरेकडचें कार्यक्षेत्र मिळालें असण्याचा संभव आहे. महादेवभट हिंगण्यांच्या घराण्यांत जयपूरच्या राजवंशाच नाशिकरिपर्यी आनुवंशिक तीर्थोपाध्येपण असल्यामुळें जयपूरमध्यें त्याचें वजन पडण्यासारखें होतें. सवाई जयसिंहामुळें महादेवभटाच्या तरतरीत खान दौरान, सफदरजंग इत्यादिकांशीं गांठी-

मेरी होऊन याचा दिल्ली दरबारांत प्रवेश झाला. सर्वांचें आपसांत कितपत सूत होतें हें सांगतां येत नाहीं. पण बाबाजी गणेश व महादेवभट यांमध्यें कांहीं तरी धुमफूस होती असें दिसतें (ऐसप्त २।२१९) प्रथम प्रथम हे सर्वच उत्तरेंतील राजकारणांत अनिर्बंध वावरत होते. पण हळूहळू महादेवभटानें इतरांना मागें टाकलें व तोच निकडीचे राजकारणांत प्रमुख बनला.

या काळांत दिल्ली दरबारांत इराणी व तुराणी असे दोन पक्ष होते. तुराणी पक्षांत सामान्यतः तुर्की, मध्य आशियाई, अफगाण, रोहिले, इत्यादि सामील असून समयपरत्वें होणारा मुख्य प्रधान पहिला निजाम, मुख्य प्रधान कमरुद्दीनखान हे याचे पुढारी होते. उलट इराणी पक्षांत इराणी व हिंदी मुसलमान व हिंदू हे सामील असून सफदरजंग, जयपूरचा राजा महाराजाधिराज सवाई जयसिंग, त्याचा प्रधान अयामल, खान दौरान, यादगारखान हे या पक्षाचे पुढारी होते. तुराणी पक्ष मराठे, शीख व जाट यांच्या तडाख्यांतून बादशाही वाचविण्यासाठीं परकीयांची मदत घेण्यास तयार होता तर इराणी पक्ष मराठे, रजपूत, जाट, इत्यादि हिंदू व हिंदी मुसलमान यांच्या बळावर बादशाही तारण्याच्या खटपटींत होता.

४

या पत्राचे आवरणावर ' यादगारखानाचे पत्र चिमाजी आपाचे नांवे जावसाली ' असा शेरा असल्यामुळें प्रेषक ग्राहक दोन्ही समजले. पण कालनिर्देश नाहीं व पत्राच्या पोटांत कालनिर्देशाचें गमकही नाहीं. यामुळें याही पत्राचा कालनिश्चय करतां येत नाहीं

५

हें पत्र बाजीरावास लिहिल्याचें पत्रांतच असलें तरी प्रेषक व काल याबाबत कोणतेंच गमकें नाहींत पण पेद खंड १५ पृ ८९ चौथें कलम हें पत्र उम्दतुल्मुल्कानें पाठविलें असें सांगतें आणि मासिरुल उमराववरून यांचें नांव इसहाक अमीरखां असून बहुधा हा इराणी पक्षाचा होता असें वाटतें (हिंमा २।२४८)

६

या पत्राच्या पोटांत जुलूस १७ शाबान २७ ही तारीख आहे हा व याच प्रकरणांत पुढील पत्रांत आलेला जुलूस दिल्लीचा मुघल बादशाह मुहम्मदशाह याचा आहे असें समजून तारखा काढल्या आहेत. या पत्रांत आलेल्या हकीकती १ ल्या बाजीरावाच्या कारकिर्दीच्या उत्तरार्धांतील व बाळाजी बाजीरावाच्या कारकिर्दीच्या आरंभीच्या असल्यामुळें आणि एरवीं मुहम्मदशाह गादीवर असल्यानें जुलूस त्याचा मानणेंच आवश्यक आहे. पत्रांत कमरुद्दीनखान, सवाई जयसिंह, आया, यावरून वर्षनिर्णय

लिक, महाराजाधिराज, अवधगवाद असे पर्यायशब्द वापरले आहेत. हें व यापुढील तीन अशीं चार पत्रें खान दौराननें बाजीरावास लिहिलीं आहेत असें पेद खंड १५ पृ. ८७,८८ वरून वाटतें. पेद १५ पृ. ८९ तिसरें कलम बहुधा याच पत्राचा सारांश असावें. पण दोहों-मध्ये किती फरक आहे हें व या पत्राचें श्रेष्ठत्व सांगण्याची आवश्यकता नाहीं.

७

या पत्रांत कालनिर्देश नाहीं. पण कालनिर्णयास उपयोगी पडणारीं उत्तम गमकें आहेत. प्रथम हें पत्र पूर्वीप्रमाणेंच यादगारखान किंवा खान दौरान यांपैकीं कोणी तरी एकानें बाजीरावास लिहिलें आहे असें गृहीत धरून चालूं या. यांत आपल्या मातुश्री गंगास्नान व इतर ठिकाणच्या यात्रा यांच्या इरादानें जयनगरास पोचल्या असें नमूद आहे. पहिल्या बाजीरावाची आई राधाबाई हिची काशीयात्रा प्रसिद्ध आहे. या यात्रेची कालानुक्रमें नोंद पेद ३०।११५, मच १३०, पेद ९।१११, १४।१२१, ९।११२, ३०।१२६, १२८, १४।१३१, ३०।१३१, १४।१४७, ३०।१३४, १४।१३९, ९।११३, ३०।१४७, ९।११४, १४।११, २२।११४, ३०।१८०, ९।११६, २२।१३९, ३३०, ३०।१६८, १६७, ९।११८ अशा चोवीस ठिकाणीं तरी कांहींना कांहीं माहिती आली आहे. तीवरून ही यात्रा साधारणपणें इ. १७३५ च्या आरंभीं सुरू झाली व इ. १७३६ मध्यास संपली असें दिसतें. या पत्रांपैकीं पेद ९।११२ हें पत्र ता. १८।५।१७३५ चें असून त्यांत राधाबाई दरमजल सत्वरींच जयपुराम जाणार असें सांगितलें आहे. पेद ३०।१३१ मध्यें ती ता. ११।७ १७३५ ला आमेरमध्यें (जयपूरजवळ) असल्याचें नमूद आहे आणि पेद १४।१३१ वरून ती १६।७।१७३५ ला जयपूर येथें होती असें ठरतें. तेव्हां हें पत्र इ. १७३५ जून किंवा जुलै या दोन महिन्यांत केव्हां तरी लिहिलें आहे असें निष्पन्न झालें. यांत आपल्या आगमनाची गेल्या वर्षी फार वाट पहिली अशी नोंद आहे. तेव्हां असें वाटतें कीं इ. १७३४-३५ सालींच बाजीराव इराणी पक्षांतील खान दौरान, सवाई जयसिंह वगैरेंच्या बोलावण्यावरून पादशाहास भेटण्यासाठीं दिल्लीस येईल अशी ती पक्ष अपेक्षा करीत होता पण बाजीरावाच्या हातून तें घडलें नाहीं. म्हणून या वर्षी पादशाहा संपतांच पुण्याहून निघून उत्तरेकडून दिल्लीस येण्याविषयीं या पत्रांत पुन्हा विनंति केली आहे. या विनंतीप्रमाणें बाजीराव या व पुढील दोन्ही वर्षी दिल्लीस जाऊं शकला नाहीं. इ. १७३७ च्या एप्रिलमध्यें तो दिल्लीस गेला, पण त्या वेळीं दिल्ली-वरील मुसलमानांस भयचकित करावें हा हेतु धरून तो गेला होता. त्याप्रमाणें मुसलमान भयचकित झालेही; पण तो परिणाम तात्कालिक होता. या वेळीं बाजीराव दिल्लीस गेला नाहीं याचें कारण त्याच्या मागच्या पुढच्या हालचाली अवघड त्यास दिसेना हें असावें. याशिवाय व यापुढील पत्रांवरून येवढें मात्र स्पष्ट दिसतें कीं, मोगली पादशाहीचें संरक्षण करण्याची शक्ति आपणांमध्यें येण्यासाठीं मराठी सत्तेच्या मदतीची [illegible] ——

आहे असें इराणी पक्षास वाटत असल्यानें दिल्लीच्या राजकारणांत मराठ्यांचा शिरकाव करून देण्यास तो पक्ष आतुर होता एर्‍हीं दिल्लीची बादशाही कमजोर झाली असली तरी तिचा आब अजून गेला नव्हता ते हा मराठ्यांनाही वाटलें कीं, दिल्लीची सत्ता आपल्या हातीं आली तर आपला अधिकार सब हिंदुस्थानावर सहज पसरू शकेल विशेषत एका पक्षाकडून कीं दुसर्‍या निमंत्रणावर निमंत्रणें येऊं लागल्यानें मराठ्यांस विलक्षण प्रलोभन वाटणें अगदीं साहजिक होतें सुमारें सतरा वर्षांनंतर इ १७५२ च्या मध्यापूर्वी झालेल्या प्रसिद्ध अहदनाम्याच्या रूपानें वरील अंदाज तंतोतंत प्रत्यक्षांतही उतरला तेव्हां मराठे दक्षिण सोडून उत्तरेंत गेले यांत गैर-मुत्सद्दीपणाचें कांहींच नव्हतें बादशाहीचें रक्षण करण्यास कोणी तरी पाहिजे होतें मराठे गेले नसते तर आणखी कोणी जाते व बलिष्ठ होऊन मराठ्यांस त्रास देते तेव्हां मराठ्यांनीं पसारा मांडला हें ठीकच केलें, पण मांडलेला पसारा आवरून धरण्याइतकीं मनुष्य, द्रव्य व बुद्धि हीं बळें आमच्या पाशीं नव्हतीं, त्याचा तुकडा पडला व तो भरून काढण्याचे उपाय आम्हीं शोधू शकलों नाहीं हाच आमचा दोष इ १७३५ जून–जुलै पूर्वी राणोजी शिंदयान मोगली सत्तेनें त्याच्या सत्तेविरुद्ध कोणती आगळीक केली होती हें नीट ध्यानांत येत नाहीं पण इ १७३६ मध्यें त्याजविरुद्ध असाच आगळिकाचा आरोप आला असता त्याचा त्यानें स्पष्ट शब्दांत इनकार केला आहे ( हिंद १।५,७ ) राधाबाईची यात्रा निर्विघ्नपणें पार पडावी म्हणून उत्तरेंतील मुसलमान सत्ताधार्‍यांनीं आपले लोक बरोबर देणें, दस्तकें देणें, इत्यादि तजवीज कशी केली हें पेद १४।३१, ३९ व ३०।१३४ या पत्रांवरूनही कळून येतें

१०

या पत्राचे आवरणावर ' खान दौरा यांचें पत्र धोंडोपंत यास ' असा मजकूर असल्यानें पत्र कोणी कोणास लिहिलें याचा तात्काल उलगडा होतो

११

पेद १४।५० मध्येंही महादेवभट नासिककर ( हिंगणे ) जयपुरास गेल्याचें आणि राजा अयामल किंवा राजामल यास बाजीरावाकडे पाठविल्याचें नमूद आहे या पत्रांत अयामल जयपुराहून बाजीरावाकडे येण्यासाठीं केव्हा निघाला ती तारीख दिली आहे

१२

पेद १५ पृ ८६ च्या शेवटीं शेवटीं किंवा तिसर्‍या कलमांत आलेला मजकूर येथें थोड्या अधिक विस्तारानें आला आहे पण दोन ठिकाणीं फरक झालेला दिसतो तेथील कागदास ' महमदशा पातशा याचा फर्मान ' असें म्हटलें असून त्याची तारीख ' छ ४ जमादिलावल सन जुलूस १९ ' ( इ १७३६ सप्टेंबर २९ ) अशी दिली आहे, पण प्रस्तुत

१६

या पत्रांतील २ ते १० हे परिच्छेद दुवंघी ( २,४,६,८,१० हे उजवीकडे व ३,५,७,९, हे डावीकडे ) आहेत. पण छापण्याच्या सोईसाठीं ते एकामागून एक घेतले आहेत. या पत्राचे सालीं 'पहिले खान दौरा असताही हेच करारमदार ठरले होते सांप्रत राव किरपारामजीचे विचारे वजिराचे समाधानास्तव लिहून देऊन फर्मान व नक्द पैसा याची अर्जी व गैर काने लिहे लाविली उगाच विकल्प काशास बाइवा म्हणून नात(?) कामावर नजर दिधली विदित होये' असा मजकूर आहे. हा करारनामा नक्कल आहे व असणारच. अमल करारनामा मोगली दरबारांत गेला असेल. त्याची शेन्यांशी कृच्याची नकलही पेशवे दप्तरांत असण्याचा संभव. पण मला ती सांपडली नाहीं. हा सारांशरूपानें पेद संड १५, पृ. ९५, ९६ वर आला आहे. येथील सारांश अधिक स्पष्ट आहे यांत निश्चित कालनिर्देश नाहीं; पण कालनिर्णयाची गमकें आहेत या पत्राच्या सालीं पहिले खान दौरा असताही इत्यादि मजकूर आहे. या मुनकाश्री प्रयोगावरून हें पत्र खान दौरानच्या मरणानंतर लिहिलें असलें पाहिजे खान दौरान इ. १७३९ फेब्रुवारी १५ रोजीं मेला. तेव्हां हें करारपत्र त्यानंतरचें ठरतें. करारच्या आरंभींच हा बाबाजी बाजीराव आणि चिमाजी आप्पा यांनीं केल्याचें सांगितलें आहे. बाळाजी बाजीराव इ. १७४० जून २५ रोजीं पेशवे पदावर आला आणि चिमाजी आप्पा इ. १७४० डिसेंबर १७ रोजीं वारला ( रा ४ पृ. १७४. हिंद १ पृ १६० ) तेव्हां हा करार या दोन तारखांच्या दरम्यान झाला असला पाहिजे. शेन्यांत निर्देशिलेला बाबा कोण हें नीट समजत नाहीं. महादोबा पुरंदरे किंवा स्वतः बाजीरावही येथें विवक्षित असूं शकेल. पण निश्चय करतांना प्रत्येकाच्या बाबतींत अडचणी आहेत. राव किरपाराम हा सवाई जयसिंहाचा दिल्लीच्या मोगली दरबारांत असलेला वकील.

१७

या पत्रांत कालनिर्देश नाहीं; पण कालनिर्णयाचीं गमकें आहेत. पत्र बाळाजी बाजीरावास उद्देशून असल्यानें व तो इ. १७४० जून २५ रोजीं पेशवा झाल्यानें पत्र तदनंतरचें असलें पाहिजे. बाळाजी बाजीराव इ. १७४० नोव्हेंबर ११ रोजीं उत्तरेंत जाण्यासाठीं निघाला, इ. १७४१ जानेवारी ७ रोजीं त्याची व आसफजाहाची मौजे दोंदे परगणे एदलाबाद येथें भेट झाली ( पावगे २ पृ. २३९ ). यापूर्वी कांहीं महिने आसफजाह ( निजमुन्मुल्क ) व त्याचा मुलगा नासिरजंग अथवा निजामुद्दौला यांचें भांडण चालू होतें. पण बाळाजी बाजीराव व निजाम यांची स्नेहभावानें भेट झाल्याचें समजतांच नासिरजंग विरोध टाकून देऊन बापास शरण गेला. या भांडणांत बाळाजीनें निजामाशीं स्नेह वर्धन केला हें त्यानेंच आपल्या एका पत्रांत स्पष्ट केलें आहे ( हिंद १२० ). या भेटीनंतर तो इ. १७४१ फेब्रुवारी ६ चे

सुमारास नर्मदा उतरला, आणि गोंड सावंरें प्रांतांतील देवगी व गुद्द गोंड सावंरें हीं ठिकाणें त्यानें इ. १७३१ मार्च ८ पर्यंत हस्तगत केलीं. मार्च ११ स त्यानें गोंड भागन्याहून पुढें कूच केलें (चापापेरी २ पृ. २३९, ऐसंसा ७७) व येथूनच त्यानें बापूराव मल्हार याला दिल्लीस बादशाहाकडे रवाना केलें. प्रस्तुत पत्र कोणी लिहिलें हें नीट कळत नाहीं. एरव्हीं खान दौरान व बादशाहासान दोघेही मरून गेले होते. महाराजाधिराजाकडून भाण्याविषयीं पत्रांत सांगितलें असल्यानें सवाई जयसिंहही लेखक असूं शकणार नाहीं राजा अयामल्ही असू शकणार नाहीं. तेव्हां लेखक दिल्लीचा आणखी कोणी मुत्सद्दी कदाचित् अमीरखान असला पाहिजे ( हिंदि १११३,१५ ).

## १८

वास्तविक इराणी पक्ष दिल्लीची बादशाही तारण्यासाठीं एक वेळ बाहेरच्या मुसलमानांची मदत घ्यावी पण मराठ्यांची घेऊं नये असें आग्रहानें म्हणत होता तरीही मराठ्यांचा दिल्लीच्या राजकारणांत प्रवेश झाला. तो अधिकाधिक सोल होत राहणार, परिस्थितीमुळें तसं होण्याचें कांहीं केल्यां चुकत नाहीं हें ध्यानांत आल्यावर धर्त निजाम तुराणी पक्षाचा एक प्रमुख पुढारी असतांही मराठ्यांवर आपण उपकार केले अशी भावना आपण त्यांमध्यें उत्पन्न केल्यास ती आपलें दक्षिणेंतील राज्य टिकण्यास फार उपयुक्त ठरेल या विचारानें मराठ्यास म्हणूं लागला कीं, इराणी पक्ष बादशाहाकडून तुम्हांस जें मिळवून देईल त्यापेक्षां माझ्या तर्फेनें चाललयास मी अधिक मिळवून देईन.

मराठ्यांचा दिल्ली दरबारांत प्रथम प्रवेश इराणी पक्षामुळें झाला व तो त्यांस अधिक अनुकूल होता. त्यामुळें तो पक्ष म्हणत होता कीं आज आमच्याकडून होणारा तुमचा फायदा निजामी प्रलोभनाच्या मानानें कमी दिसत असला तरी दूरच्या फायद्यावर नजर ठेवून तोच तुम्हीं स्वीकारावा. बाजीरावानें इ. १७३७ च्या शेवटीं निजामास भोपाळ येथें कोंडल्यावर निजाम मराठ्यांच्या कांहीं मागण्या बादशाहाकडून कबूल करून देण्यास तयार झाला, पण बाजीरावाचा विश्वास इराणी पक्षावरच होता. नादिरशहाच्या स्वारींत त्या पक्षांतील बरेच लोक मारले गेले अणि तुराणी पक्षातर्फे निजामान समेट घडवून आणला होता. यामुळें तो पक्ष व निजाम यांचें वजन एका बाजूनें वाढलें होतें तर दुसऱ्या बाजूनें मुलगा नासिरजंग याच्या बंडामुळें निजाम पेंचांत होता. यामुळ बाजीराव मेला असतांही त्यानें बाळाजी बाजीरावाची आपण होऊन भेट घेतली व प्रलोभनें दाखविलीं. दोन्ही पक्षांची मराठ्यांच्या बाबतींत कशी ओढाताण चालली होती हें हिंदि ११५,१७ १६-२४ या पत्रांवरून उत्तम तऱ्हेनं ध्यानांत येतें. हीं पत्रें खास पेशव्यांनींच पाठविलीं असल्यानें त्यांचें महत्त्व अपूर्व आहे. प्रस्तुत करार आसफजाहाच्या मध्यस्थीनें होत असल्याचें आरंभींच म्हटलें असलें तरी महाराजाधिराज ( सवाई जयसिंह ), समसामुद्दौला (खान दौरानचा मुलगा), अम-

जमखान व मुहम्मद सईदखान हे कराराच्या वेळीं उपस्थित आहेत. यांपैकीं पहिले दोन तर इराणी पक्षाचे होते. मुहम्मद सईदखान तुराणी पक्षाचा दिसतो (कामा ३।१७७).

१९

या पत्राच्या पाठीवर 'राणया मल्हारया पिलाजी जाधव यशवंतराव पंवार याचे नावें करारनामा पातशाहास पाठविला तो' असा शेरा आहे. हा व पाठीमागचा अशा दोन्ही करारनाम्यांवर एकच तारीख असल्यामुळे दोन्ही एकाच दिवशीं लिहून दिले गेले हें उघड आहे. इ. १७४१ मे १२-१९ पर्यंत बाळाजी बाजीरावाचा मुक्काम मध्य हिंदुस्थानांत चंबळेच्या काठीं धोलपूर येथें होता ( बावापेशे २ पृ. २४०, पुद १।१४९ ) त्याच वेळीं पत्र क्र. १८, १९ व २० हे तिन्ही करारनामे इराणी, तुराणी व मराठा अशा तिन्ही पक्षांतील प्रतिनिधिभूत व्यक्ति एकत्र जमून झाले असले पाहिजेत.

२०

हा करारनाम्याच्या उजव्या अंगास दोन वाटोळ्या शिक्क्यांत अनुक्रमें (१) '० श्री ० । राजा शाहु नरप । ति हर्षनिधान बा । ळाजी बाजीराव । मुख्य प्रधान० (उलटा)' आणि (२) 'लिखन सीमा' असा मजकूर आहे. याचा अर्थ असा कीं, या करारनाम्यावर बाळाजी बाजीरावाचें खास शिक्कामोर्तब आहे. मग हा कागद पेशवे दप्तरांत कसा आला असा प्रश्न उत्पन्न होतो. असें वाटतें कीं, एक तर हा करारनामा बादशाहाकडे गुदरला गेला नसेल. किंवा गुदरलेला कागदपत्रें परत घेतला गेला असेल, किंवा गुदरलेल्याची ही हुबेहूब नक्कल असेल पाठीमागचा करार ( क्र. १८ ) आसफजाहाच्या मध्यस्थीनें व दोन्ही पक्षांच्या प्रतिनिधींसमक्ष झाला असला तरी एव्हां बादशाहास तुराणी पक्षाचा आणि विशेषतः पहिल्या निजामाचा विश्वास वाटत नव्हता, त्याच्या निष्ठेविषयीं त्यास शंका आली होती म्हणून बादशाह तुराणी पक्षाचे नादास न लागतां इराणी पक्षास जवळ करीत होता. पण इराणी पक्ष व बादशाह यास संशय येई कीं, पेशवे व निजाम दोघेही दक्षिणेंत स्थाइक झाले होते, दोघांची भेटही नुकतीच झाली होती, तेव्हां दोघे एक होऊन सर्वच राज्य बळकावून आपणास निर्नाम्यवत् तर करणार नाहींत ना ! म्हणून हा अंतस्थ किंवा गुप्त करार केला गेला असावा.

२१

या पत्राचें पाठीवर कमरुद्दीनखानाचा शिक्का असल्यानें हें त्यानें धाडलें आहे हें उघड ठरतें. करारनामे झाल्यानंतर पाठविलेलें औपचारिक पत्र येवढीच याची किंमत असावी.

२२

या पत्रांत कालनिर्देश नाहीं पण बाळाजी बाजीरावास लिहिल्यामुळें हें इ. १७४० जून २५ पूर्वीचें होऊं शकणार नाहीं आणि महादेवपंडित हिंगणे इ. १७४४ फेब्रुवारी

६ रोजी वारल्यामुळें ( पृ० १।१५४ ) त्यानंतरच होणार नाही. अस्तद्खानाखान कोणत्या पत्रांतली व्यक्ति आहे हें ध्यानांत येत नाहीं

## २३, २४

हीं दोन पत्रें ओरीसा व बंगाल यांमध्यें रघूजी भोसले व त्याचा सेनापति भास्कर राम कोल्हटकर यांनीं जो धुमाकूळ घातला होता त्यासंबंधीं आहेत पैकीं पहिल्या पत्राची तारीख निश्चित आहे दुसरें पत्र बंगालचा तत्कालीन सुभेदार अलीवर्दीखान यानें महादेवभट हिंगणे यास लिहिलेलें दिसतें पत्रांत भास्कर रामाचा अलीवर्दीखानानें मरवा, पचेत, मेदिनीपूर ( मिदनापूर ), कटक, अथरपूर सुद्धां या ठिकाणांपर्यंत पाठलाग केल्याचें सांगितलें आहे सेरे मुताखरीनमध्यें हि ११५५ च्या शाबान महिन्यांत ( इ. १७४२ सप्टेंबर १८ ते आक्टोबर १७ ) भास्कर रामाचा मोठा पराभव होऊन पचेत, विष्णुपूर, चन्द्रकोण, मेदिनीपूर, बालासूर, या ठिकाणाहून चिल्का सरोवरापर्यंत ( सुर्यांच्या नैर्ऋत्येस ) त्याचा पाठलाग करण्यांत आला असें नमूद आहे ( इमनी भाषांतर कलकत्ता, १९०२, १ ला खंड, पृ ४०२-४०६ ) या पत्रांत जवळ जवळ तेंच सांगितलें असल्यानें हें पत्र मी इ १७४२ आक्टोबर १५ च्या सुमाराचें असेल असें धरलें आहे पण थोडें पुढचें म्हणजे डिसेंबर १५ च्या सुमाराचें धरलें तरी चालण्यासारखें आहे कारण अलीवर्दीखान जिल्काद महिन्याच्या अखेरीच्या ( इ. १७४३ जानेवारी १६ ) सुमारास पाठलाग सोडून कटक येथें परतला होता ( सदर पृ ४०८ ) या पत्रांत बाळाजी बाजीरावानें रघूजी व भास्कर राम यांस तंबी देण्यासाठीं देवगड चांदाकडे जावें असें अलीवर्दीखानाचें मत असल्याचें नमूद आहे. पण एव्हां बाळाजी बाजीराव प्रयागजवळ गेला होता

## २५

हा द्वैभाषिक कागद विजापूर येथील मिया सैफन साहेब लालसाहेब मिरधे हे मुंबईस फेरीवाल्याचा धंदा ( हॉकर ) करीत असतां त्यांकडून मिळाला हा अतिशय जुना असून यांत जमीन मोजण्याचा एक विशिष्ट प्रकार सांगितला असल्यानें येथें प्रकाशित केला आहे याच्या फार्सी भागांतील जमिनींचें माप सांगणारे रकमी पद्धतीचे आकडे साध्या पद्धतीनें लिहिले आहेत याच्या मराठी भागांत शेताचें माप देताना केवळ बिघ्याचा उल्लेख केला असला तरी फार्सी भागांत बिघे व बिस्वे अशा दोन मापांचा निर्देश असून वीस बिस्व्यांचा एक बिघा होई असें दिसतें किंबहुना बिस्वा याचा यौगिक अर्थ अनुक्रमें 'विसावा → वीसवा → बिस्वा' अशा क्रमानें विसावा हिस्सा असाच असावा पूर्व-पश्चिम व दक्षिण-उत्तर या दिशांस असलेल्या शेतांच्या सीमांचे रेषांच्या लांबींची सरासरी काढून आलेल्या लांबीरुंदी हीच्या शेताची मध्यम लांबीरुंदी धरली आहे व त्यांचा गुणाकार करून शेताचें क्षेत्रफळ काढलें आहे. यांत लांबीरुंदीचें एकेरी linear मान

सांगतांनाही बिघे व बिस्वे हींच मापें आणि क्षेत्रफळाचें चौरस square ... बिघे व बिस्वे हींच मापें सांगितलीं आहेत. हें कसें केलें आहे तें येथें थोडक्यांत दाखवितों. शेताच्या पश्चिम व पूर्व या दिशांकडील भीमांची लांबी अनुक्रमें ९८३ व ८॥ अशी दिली असून मध्यम लांबी ८॥।४ अशी दिली आहे. पहिल्या दोन रकमांची बेरीज १७॥३ इतकी होते. या रकमेची निमपट ८॥।४ इतकी दिली आहे. एका उभ्या रेघेचा अर्थ पांच बिघा किंवा पाच बिस्वे केल्याशिवाय १७॥३ या रकमेची निमपट ८॥।४ होणार नाहीं. शेताच्या दक्षिण व उत्तर दिशांस असलेल्या सीमारेषांचीं मापें अनुक्रमें ७।१ व ६।।२ अशीं दिलीं असून त्यांची निमपट किंवा शेताची मध्यम रुंदी ६॥।४ अशी दिली आहे. पहिल्या दोन रकमांची बेरीज १३॥३ येते हें सहज ध्यानांत येण्याजोगें आहे. पण निमपट ६॥।४ इतकी व्हावयास पूर्वीप्रमाणें एक उभी रेघ किंवा पाच बिघा म्हणजे पांच बिस्वे हें कोष्टक गृहीत धरावेंच लागतें. असो. तर या शेताची लांबी ८॥।४ व रुंदी ६॥।४ म्हणजे अनुक्रमें पावणे नऊ बिघे चार बिस्वे व पावणे सात बिघे चार बिस्वे अशी सांगितली असून त्याचें क्षेत्रफळ ६२८४ बिघे = ०॥२८४ चावर इतकें सांगितलें आहे. ८॥।४ = $\frac{१७५}{२०}$ व ६॥।४ = $\frac{१३५}{२०}$ यांचा गुणाकार $\frac{२४६६१}{४००}$ होतो. म्हणजे ६२$\frac{६१}{४००}$ बिघे किंवा यांतील $\frac{६१}{४००}$ हा अंश सोडला असतां ६२८४ बासष्ट बिघे चार बिस्वे किंवा ०॥२८४ अर्धा चावर, दोन बिघे व चार बिस्वे इतकें क्षेत्रफळ होतें.

जमीन मोजणीचा हा प्रकार शिवपूर्वकालीन व विजापुराकडील आहे. कोंकणांत शिवकालीन जमीनमोजणीचा हिशेब कसा करीत हें पुढील उदाहरणावरून नीट ध्यानांत येईल. के. राजवाडे संपादित मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खं २० ले. १९३ मध्यें कोंकणांतील जमीन मोजणीविषयीं पुढील हिशेब आले आहेत. कंसांतील खुलासे हिशेब नीट समजण्यासाठीं म्हणून मी आपल्या पदरचे घातले आहेत. ( १ ) सेत रेडेसरी यासी मोजणी तूल ( लांबी काठ्या ) ४४; अर्ज ( रुंदी काठ्या ) १४ + २४ + १७ = ५५, तिजाई (तिसरा हिस्सा किंवा सरासरी किंवा मध्यम रुंदी) १८॥ ( काठ्या ) एकूण जमीन मेहि ( ४४ × १८॥ = ) ८१४ (चौरस काठ्या = ४० पांड किंवा २ बिघे १४ चौरस काठ्या किंवा हिशेबाच्या सुलभतेसाठीं १५ चौरस काठ्या किंवा ८॥॥ पांड =)एकूण बिघे ८२८॥ ( २ ) सेत कलनसरी यासी मोजणी ८॥४॥ किता $\sqrt{\frac{१७ \quad १७}{२८९}}$ ( चौरस काठ्या = १४ पांड, ९ चौरस काठ्या किंवा हिशेबाच्या सोईसाठीं १४ पांड, १० चौरस काठ्या = अर्धा बिघा, ४॥ पांड = ) ८॥४॥ ( ३ ) ८२।१। किता तूल ४२ ( लांबी काठ्या ); अर्ज ( रुंदी काठ्या = ) २२ + २७ + १७ = ६६; (तिजाई तिसरा हिस्सा किंवा सरासरी किंवा मध्यम रुंदी) तिजाई २२ (काठ्या ∴ ४२ × २२ = ) $\sqrt{९२४}$ ( चौरस काठ्या = ४६ पांड, ४ चौरस काठ्या किंवा हिशेबाच्या सोईसाठीं ५ चौरस काठ्या = ४६। पांड = २। बिघे, १। पांड = ) ८२।१। ( ४ ) सेत कानई

पालपातोड़ा तूल १३, अर्ज ५ ( ∴ १३ × ५ = ) $\sqrt{६५}$ (चौरस काठ्या = ) एकूण जमीन ८८३। ( सवा तीन पांड ). या हिशेबावरून येवढें दिसतें कीं, जमिनीची मोजणी ( लांबी व रुंदी ) काठ्यांत सांगितली आहे. लांबीचें माप फक्त एकच आहे. पण रुंदीचीं तीन मापें घेऊन त्यांची सरासरी काढली आहे. नंतर गुणाकारानें चौरस काठ्या करून त्या वर्गमूळाचे चिन्हाखालीं मांडल्या आहेत. चौरस काठ्यांचे पांड व बिघे केले आहेत. ४,६,१४ अशा काठ्या उरल्या असतां त्यांबद्दल पाव, अर्धा, पाऊण पांड धरला आहे.

आपल्या प्रस्तुतच्या कागदांत $\frac{१}{४००}$ बिघा ( = १ चौरस काठी ) हिशेबाच्या सोयी साठीं सोडून दिला आहे. मी या टीपेंत सर्वत्र चौरस हा शब्द वापरला आहे. पण जुन्या कागदांत चौरस किंवा स्वेभर या अर्थी रुमाळी(र्ली) हा प्रतिशब्द होता असें पुढील उदाहरणावरून दिसून येतें. ह्या संबंधी मूळ लेख काव्येतिहाससंग्रह–पत्रें, यादी वगैरे यांत आला आहे ( नवा ले. १६०, जुना ले ४०३ ) त्याचा लागू उतारा असा–'तुम्हांस जागा पंढरी गावची वसलपैकीं सरेंदी दिधली. तपशिल गज सुमारी मो करार पूर्वपश्चिम गज सुाा १३ उत्तर दक्षिण गज १६॥ सुा १६॥ + ६२७ = ६४३॥ सदहूंप्रमाणे रुमाळा गज ६४३॥' यावरून रुमाळी म्हणजेच चौरस हें स्पष्ट ठरतें.

या पत्राच्या मराठी भागांत सुहूर सन ९५४ व हिजरी सन ९५१ असे दिले आहेत, तर फार्सी मजकुरांत सुहूर ९५४ व हिजरी ९६१ दिले आहेत. हि. ९६१ शव्वाल १० ही तारीख सुहूर ९५५ मध्यें पडते.

२६

प्रस्तुत कागद मी इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स कमिशनच्या इंदूर येथील बैठकीस गेलों असतां तन्निमित्तानें भरलेल्या प्रदर्शनांत पहावयास मिळाला. त्याचें वैशिष्ट्य तावडतोब लक्षांत घेऊन त्याच्या मालकाविषयीं चौकशी केली. तेंव्हा तो इंदूर संस्थानच्या महिदपूर जिल्ह्याचे कलेक्टर श्री. मंगेश गोविंद कर्णिकर यांनीं आणल्याचें समजलें. तेव्हां मी त्यांची गाठ घेतली. त्यांनीं प्रदर्शनासाठीं आणलेले सर्व कागद तर मला दाखवलेच, पण मला अत्यंत आस्थेनें महिदपुरास नेऊन आणि स्वतःकडेच ठेऊन घेऊन त्या गावीं व तराणा येथें अनेकांच्या संग्रहीं असलेले कागद, पोथ्या, नाणीं इत्यादि सामुग्री दाखविण्याची व्यवस्था केली. त्यांनीं दाखविलेली आस्था व आपुलकी अविस्मरणीय असल्यानें त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत.

याच्या मूळ फार्सी पाठांत गाव व जमीनीचे बिघे यांची संख्या सांगणारे आकडे ८ व १०६० हे रकमी पद्धतीचे आहेत पण ते मी साध्या पद्धतीनें मांडले आहेत. याच्या पाठीवर 'आकबर बडा बेग हुमायुन के सन ९६२' असा नागरींत शेरा आहे.

या पत्राचीं अनेक वैशिष्ट्यें आहेत. त्या सर्वांचा साकल्यानें विचार करतां तें सरें

मानावें कीं खोटें हें समजत नाहीं. तेव्हां याचा निर्णय न लावतांच तें प्रसिद्ध करीत आहे. येथें फक्त उलट सुलट मुद्दे मात्र नमूद करून ठेवितों.

प्रथम एका गोष्टीचा खुलासा केला पाहिजे. हा कागद अकबराचा फर्मान असल्यामुळें तो खोटा किंवा खरा हें ठरविण्यासाठीं त्याची अकबराच्या इतर फर्मानांबरोबर तुलना केली पाहिजे. त्यांशीं अशी तुलना करण्याची साधनें सोईस्करपणें उपलब्ध असलीं पाहिजे व त्यांशीं याची सर्वांगीण तुलना करतां आली पाहिजे. दुसरी गोष्ट ही कीं, आज अशी प्रथम श्रेणीची सामुग्री मला तरी उपलब्ध नाहीं. यापूर्वी अकबराचीं जीं फर्मानें छापलीं गेलीं आहेत त्यांत अनेक उणीवा राहिल्या आहेत. 'इंपीरियल फर्मान्स' (इफ)मध्यें याचा प्लेट फोटो आहे, पण पाठ नाहीं. फरामीनुस्सलातीनमध्यें (फस) पाठ आहे, पण छायाचित्र नाहीं. रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेच्या जर्नलमध्यें (२१ वा खंड जेबीबीआरएएस) पाठ आहे व येथें प्लेट छायाचित्र आहे. एवढ्या मुद्रांच्या सामुग्रीवरून सर्व निष्कर्ष काढणें असल्यामुळें त्यास मर्यादा येणें कठीण असलें तरी येथें चर्चेचें स्वरूप दाखविण्यात कांहींच हरकत नाहीं. आतापर्यंत पुढें दिलेल्या यादीप्रमाणें अकबराचीं सारीं दहा फर्मानें प्रसिद्ध झाल्याचें मला माहीत आहे. केवळ तारखेचा विचार करतां प्रस्तुतचें फर्मान सर्वांत जुनें आहे.

(१) प्रस्तुत फर्मान = ता. २२ रमजान हि. ९६२ = ता. १० ऑगस्ट १५५५
(२) फस पृ. ४१ = ता. ५ इस्फन्दार्मुज स.५ जु. = ता. १४ फेब्रुवारी १५६१
(३) फस पृ. ४२ = ता. ११ शव्वाल स २० जुलूस = ता. १३ जानेवारी १५७१
(४) इफ १ = ता. २९ जमर हि. ९८५. = ता. १३ सप्टेंबर १५७७
(५) इफ २ = ता. ३ सफर हि. ९८९ = ता. ९ मार्च १५८१
(६) इफ ४ = ता. ९ खुर्दाद इलाही ३८ = ता. २० मे १५९३
(७,८) इफ ४ अ, ५ = ता. १५ दय मिहर, खुर्दाद जु. ३८ = ता. २६ मे १५९३
(९) जेबीबीआरएएस ११।१६१ = ता. १० इस्फन्दार्मुज इलाही ४० = ता २० फेब्रुवारी १५९५
(१०) ,, ,, २१।१८७ = ता. २ मिहर इलाही ४८ = ता. १६ सप्टेंबर १६०३

(१) या फर्मानावर मंगलार्थक 'हुवल घनी' असें वाक्य असून तें क्र. ४,६ व ८ यांवर आहे (२) 'फर्मान जलालुद्दीन मुहम्मद अकबर बादशाह गाझी' हा तुग्रा क्र. २ व ३ सोडून सर्वच फर्मानांवर आहे. (३) या फर्मानावर असलेल्या शिक्क्यामध्यें मध्यस्थ वर्तुळांत अकबर व हुमायून यांचीं नांवें असून बाजूच्या कंकणांत बाबर, उमर शेख, अबू सईद, मुहम्मद मीरान व अमीर तैमूर अशा पाच पूर्वजांचीं नांवें आहेत. २, ६ व ८ या फर्मानांतील शिक्क्यांतही हीच स्थिति आहे. क्र. ३ व ४ वरील शिक्क्यांचें नीट ध्यानांत येत नाहीं. क्र. ५ व ७ वर निराळाच शिक्का आहे. आणि क्र. ९ व १० यांवरील

शिक्के घरच्या जातींचे असले तरी त्यांच्या मध्यस्थ वर्तुळांत फक्त अकबराचें नांव असून कंकणांत सात वर्तुळें व त्यांत प्रत्येकीं हुमायून, बाबर, उमर शेख, अबू सईद मुहम्मद मीरान, मीरान शाह व अमीर तैमूर अशा सात पूर्वजांचीं नांवें दिलीं आहेत (४) लिपी व लेखनपद्धति यांचा विचार केला तर क्र. १, ४, ५, ९ व १० यांमध्यें फार साम्य आहे. क्र. ६, ७ व ८ यांची पद्धति थोडी निराळी आहे क्र. २ व ३ यांची लिपी व पद्धति कशी होती हें समजायास मार्ग नाहीं (५) या फर्मानाच्या पाठीवर एकदा नऊ शिक्के व त्याखालीं विविध वळणाचे शेरे आहेत. मोठ्या फर्मानावर इतक्या अधिकाऱ्यांचे शिक्के व शेरे मिळू शकतील असें वाटत नाहीं. (६) या फर्मानांत आलेल्या देणगीचा निर्देश औरंगजेबाच्या फर्मानांत आला असून तेथें ती देणगी खरी मानली आहे व यांत आलेल्या व्यक्तींचेही त्यांत उल्लेख आहेत. (७) हें फर्मान आसफखानाच्या योगानें किंवा प्रमुखत्वासाठीं सुटलें असा पाठीवर शेरा आहे. 'मासिरुल उमरा' मधील यांच्या चरित्रांत याचें नांव अब्दुल मजीद हिरवी होतें, हा हुमायूनचा नोकर असून प्रामाणिकपणा व कौशल्य यांच्या जोरावर त्याचा दिवाण झाला, अकबराच्या कारकिर्दींत हा सरदारही बनला, अकबर इ. १५६० मध्यें बैरामखानाचें बंड मोडण्यासाठीं पंजाबांत गेला असतां यास आसफखान ही पदवी व दिल्लीचें अध्यक्षपद मिळालें, इत्यादि माहिती आहे (हिमा २।११४-११९) ही बरोबर असेल तर इ. १५६० पूर्वीच्या फर्मानावर त्याचें आसफखान असें नाव येऊं नये' या फर्मानात तसें आलें आहे तेव्हां हें फर्मान खोटें म्हणावयाचें की काय असा प्रश्न येतो. १० व्या फर्मानावर आसफखानाचें नांव आहे. पण तें इ. १६०३ चें असल्यानें तोंवर हा आसफखान जिवंत होता की नाहीं याविषयीं शंका आहे (८) या फर्मानाच्या तारखेस हुमायून जिवंत होता येवढेंच नव्हे तर राज्यावरही होता तो पुढें ता. ११ रबल हिजरी सन ९६३ (ता २५ जानेवारी इ. १५५६) रोजीं मेला. तेव्हां त्याच्या हयातींत अकबराच्या नावानें फर्मान सुटेल कसें व सुटलें तरी त्यास त्यांत पादशाह म्हणतील कसें। (९) हुमायूनची पहिली सत्ता कोलमडून पडल्यावर आणि मध्यंतरीं पठाण वंशें सूरींचें राज्य झाल्यावर ता २ शाबान हि. ९६२ (ता २२ जून १५५५ इ.) रोजीं सरहिंद येथें सिकंदर सूरीचा त्यानें पराभव केला व दिल्लीचें राज्य संपादिलें. या फर्मानाचे तारखेस तो दिल्लीस येऊन राज्य करूं लागला असणें शक्य आहे पण या वेळीं त्याचा अमल दिल्लीपासून सुमारें ४२५ मैलावर असलेल्या महिद्पूर गावावर चालला असेल की ? या वर्षीच माळवा सुल्तानांपैकीं शेवटचा सुलतान बाज बहादुर राज्यावर आला होता. त्याची राजधानी मांडवगड तेथून महिद्पूर सुमारें ७५ मैल आहे बाज बहादुरचें राज्य अकबरानें इ. १५६१ मध्यें खालसा केलें तेव्हां या वेळीं माळव्याच्या या भागावर बहुधा बाज बहादुराचेंच राज्य नसेल का ? मग त्यावर अकबराचें फर्मान कसें ! (१०) हुमायून गादीवर येऊन बसतो न बसतो तोंच सुभे, त्यांचे भाग सरकारें व त्यांचे भाग-परगणे इतकी व्यवस्थित विभागणी झाली असेल का ? विशेषत: पठाणी सुलतानाच्या ताब्यातील

प्रदेशाची अशी विभागणी ग्हावी हें विचित्र नव्हे का ! या फर्मानाच्या बाबतींत असें उलटसुलट पुष्कळ लिहितां येण्यासारखें आहे. असें लिहिलें जावें आणि चर्चा होऊन तत्त्वबोध व्हावा हाच हें फर्मान प्रसिद्ध करण्यांतील मुख्य हेतू आहे.

२७

हें फर्मान माझे मित्र श्री. शां. वि. आवळसकर यांना चौल येथील अधिकारी दप्तरांत मिळालें. हें गोव्याच्या हवालदारास उद्देशून लिहिलें असलें तरी यांत प्रायः चौलखेडेंड्या-विषयीं मजकूर असल्यामुळें हें चौलच्या सरकारी अर्थात् अधिकाऱ्याकडील दप्तरखान्यांत ठेवण्यासाठीं आलें. यांत मुहम्मद आदिलशाहानें आपला गोव्याचा हवालदार मिर्जा मुहम्मद रिजा यास चौलखेडेंड्याच्या पोर्तुगीज अधिकाऱ्याच्या म्हणजे कप्तानाच्या विरुद्ध गोव्याच्या व्हाइसरॉयकडे चार तक्रारींचा योग्य व अनुकूल निकाल लावून घेण्यास सांगितलें असून तसें न झाल्यास गोवें बरबाद करण्याची धमकीही देऊन ठेविली आहे. हे चार मुद्दे फर्मानांत विस्तारानें मांडले आहेत.

२८

प्रस्तुत फर्मान एरंडवणें ( पुणें ) महाविद्यालयांतील प्रो. चा. दा. गोखले यांस वेंगुर्ले ( रत्नागिरि ) येथील श्री. वामन शिवाजी महाजन यांजकडे मिळालें. ह्या बाजूचे विषयाचे कागद प्रायः अद्याप मिळाले नाहींत अशासंबंधीं हा असल्यानें येथें प्रकाशित केलं आहे. यांत बंदरनवीसी हें सरकारी काम आणि उरीं व दलाली हे दोन हक्क यांचा निर्देश आला आहे. उपर्युक्त महाजनांकडे असलेल्या एका जुन्या कागदांत वरील तिन्ही बाबींचा खुलासा आला आहे तो असा–' उरी दलाली म्हणजे जिनसाचें माप जाल्यावर शेरं अर्ध सेर जिनस राहील तो घ्यावा व जिनसाचे किमतीवर दर शेकडा सिरस्तेप्रमाणे हक्क घ्यावे. बंदरनिसी म्हणजे बंदराहून माल जाईल त्याचें वजन माप करून त्यावर हक्क घेणें.

२९

प्रस्तुत पत्र मला भोपाळ येथील श्री. ठाकूर नरहरसिंह–सुपरिंटेंडंट अकौंटंट जनरल्स ऑफिस भोपाळ यांजकडे मिळालें. यांत आरंभीं 'ब फज्ल अल्लाह मुहम्मद मुराद नजात सेर [ जु.* ] सनह ४६ [ हि* ] १११४' व मुहम्मद शरीफ काजी नियाबत खादिम शरअ [ जु.* ] ४९ [ हि* ] १११६' असे दोन शिक्के आणि 'मोतुम्ल–मतन बयान वाकअ अस्त' असा शेरा असून तीन साक्षीदारांचे तीन शिक्के आणि अनुक्रमें 'गवाह शुद' 'गवाह शुद' गवाह शुद नागिसनवीस' असे शेरे आहेत. पत्राचा पाठीन दिलेला अशा संपल्यावर मा मअजअ असे शब्द व त्याखालीं गांवांची एक मोठी यादी आहे. एक तर त्या गांवांच्या नावाचे शुद्ध उच्चार समजणें दोषयुक्त लिपिमुळें कठीण व शिवाय इतिहासदृष्टीनें तिचा तादृश उपयोगही नाहीं. म्हणून ती येथें गाळली आहे.

पत्रांत नेमाचें आडनांव दिलेलें नाहीं. पण येथें नेमाजी शिंदे विवक्षित आहे याविषयीं शंकाच नाहीं. दुराहा हें गांव भोपाळच्या वायव्येस सुमारें दहा कोसांवर असून इ. १७३८ च्या आरंभीं निजाम-बाजीराव तह याच ठिकाणीं झाला होता. या पत्रांत नेमाजी शिंदे दुराहास गेल्याची व तेथें वेढा घालून त्यानें जाळपोळ, लुटालूट व विध्वंस केल्याची तारीख औरंगजेबी जुलूस वर्ष ४८ रमजान २७ (श. १६२५ पौष वद्य १४, इ. १७०४ जानेवारी २४) ही दिली आहे. पण नेमाजी शिंद्यानें उत्तरेंत धाड घालण्याची ही एकच किंवा पहिलीच वेळ नव्हती. औरंगजेबाचें लक्ष दक्षिणेंतून उत्तरेंत स्वस्थानीं घर संभाळण्याकडे लागावें एतदर्थ मराठ्यांनीं बहुधा छत्रपति राजारामाच्या कारकिर्दीच्या अखेरीस उत्तरेंत धाडी घालण्याचा उपक्रम सुरू केला होता असें दिसतें. मराठी साधनांत नेमाजी शिंदे व केसोपंत यांनीं नर्मदेपलीकडे जाऊन इ. १७०२ च्या अखेरीस सिरोंज मारल्याचा एकच उल्लेख आहे ( शिचप्र ६७,६८ ). पण फार्सी साधनांत नेमाजीनें इ. १७०४ च्या आरंभीं माळव्यांत सिरोंजला वेढा घातल्याची हकीकत आली ( माळवा इन ट्रँझिशन पृ. ५८ ) असून या समकालीन पत्रानें तीस बळकटी येत आहे. सिरोंज दुराहाच्या उत्तरेस बरीच लांब असल्यानें तेथील वेढ्याचा प्रसंग दुराहाच्या विध्वंसानंतर अर्थात् इ. १७०४ जानेवारी २४ नंतर झाला असला पाहिजे.

## ३०-३२

हीं पत्रें सिन्नर येथील देशमुख घराण्यापैकीं श्री. बापुराव रावजी देशमुख वकील हल्ली वस्ती गाडगीळ देवी गल्ली नाशिक यांजकडील जुन्या कागदांचीं दप्तरें चाळीत असतां इतर सुमारें १०० कागदांबरोबर मिळालीं. या दप्तरांत फार्सी व मराठी कागद पुष्कळच होते. पण मराठी कागद तेथल्या तेथेंच अधिक नपाहून अगदीं निवडक १०।१५ मंडळांत घेऊन आलों; पैकीं एक बराच महत्त्वाचा वाटला तो इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स कमिशनच्या इ. १९४८ च्या दिल्ली येथील अधिवेशनांत वाचलेल्या निबंधांत साररूपानें उद्धृत केला. येथें आणलेल्या शंभरावर फार्सी कागदांपैकीं ४०।४५ कागदांच्या नकला करून घेतल्या. पण त्यांतून छापण्यासारखे सध्या हे चारच निघाले. बाकीचे वैयक्तिक बाबींविषयीं असल्यानें इतिहासांत महत्त्वाची भर घालीत नाहींत, म्हणून बाजूस ठेविले. सिन्नरच्या देशमुखांच्या पूर्वजांत कुंवर बहादुर नांवाचा एक बराच महत्त्वाचा पुरुष होऊन गेला याची कारकिर्द नेमकी केव्हां सुरू झाली हें सांगता येत नाहीं पण या आणि कमिशनच्या निबंधांत उपयोग केलेल्या पत्रांवरून तो इ. १७२४ मध्यें लष्करी हालचालींत भाग घेण्याइतका मोठा होता हे स्पष्ट आहे. इ. १७३१ एप्रिल १ ला पहिला बाजीराव व त्रिंबकराव दाभाडे यांमध्यें डभईस लढाई झाली तींत मोगलांतर्फे अर्थात निजामाकडून दाभाड्याचा मदतीस आलेल्या लोकांमध्यें कुंवर बहादुर होता. पण तींत जखमी झाल्यावर तो पळून गेला मराठ्यांच्या सत्तेचा प्रसार जोरानें होऊं लागल्यानें या लढाईच्या आगेमागे आपण मोगलांकडे रहावें की मराठ्यांकडे जावें याविषयीं त्याच्या

मनाशी चलबिचल सुरू झाली. इमईच्या लढाईपूर्वी त्यानें मराठ्यांकडील मनाचा पोशाख स्वीकारला होता नाहीं इमईार तो पेशव्यांविरुद्ध लढला. पण नंतर त्याच्या मनांत अधिक बदल होऊन इ. १७३६ मे ३ रोजीं तो गेला तेव्हां पेशव्यांकडे आश्रय होता असें दिसतें (पेद १२।५०, ३।१८७, १०।१८, १०।१६५). या चार पत्रांकीं क्र. ३१–३३ या तिहींचे कालनिर्देश पूर्ण आहेत. फक्त त्यांतील जुलूस वर्ष मुहम्मदशाहाचें आहे येवढेंच गृहीत धरलें आहे. क्र. ३१ व ३२ हे त्यामुळें इ. १७२४ चे ठरतात. क्र. ३० मधील कालनिर्देश अपूर्ण असला तरी तारीख व वार यांचा मेळ घालण्यासाठीं आणि पत्रांतील हकीकतीचा उलगडा होण्यासाठीं हें पत्र इ. १७२४ मध्येंच घातलें पाहिजे. इ. १७२४ सप्टेंबर ३० रोजीं दक्षिणेचा अधिकृत मोगली सुभेदार मुबारिजखान व त्याचा प्रतिस्पर्धी पहिला निजाम यांमध्यें वऱ्हाडांत साखरखेडलें येथें मोठी लढाई होऊन तींत मुबारिजखान मारला गेला व त्याच्या पक्षाची वाताहत झाली, निजामास जय मिळून त्याचा दक्षिणेंत पक्का पाय रोवला गेला. हीं चारी पत्रें कुवर बहादुराला उद्देशून असल्याविषयीं शंकाच नाहीं. कारण तीं कुवर बहादुराच्या घराण्यांतच मिळालीं असून ३३ च्यावर तर कुवर बहादुराचें नांवही आहे; पण पहिलीं तीन मुबारिजखानानें पाठविलीं असावीं असें वाटतें. कारण लढाईपूर्वीच्या हालचालींत निजाम वऱ्हाणपुराहून औरंगाबादेस येऊन नंतर साखरखेड्याकडे गेल्याचें आणि मुबारिजखान मछलीबंदर जवळच्या ! फुलचर्ग गांवाहून हैदराबादेस येऊन साखरखेड्याकडे गेल्याचें मासिरुल–उमरामध्यें नमूद आहे (फामा ३।७३७–७३९). विशेषतः निजाम ६ व्या जुलूसच्या जिल्काद महिन्यांत (इ. १७२४ जुलै १०) नंतर औरंगाबादेस पोंचल्याचें सांगितलें असल्यानें तत्पूर्वीच व या क्र. ३० च्या पत्राचे तारखेनंतर लवकरच मुबारिजखानानें औरंगाबाद व्यापण्याचा प्रयत्न केला असणें अगदीं स्वाभाविक आहे. आतां या प्रयत्नांत तो कितपत यशस्वी झाला हा प्रश्नच आहे. कारण त्यानें औरंगाबाद पक्की व्यापिली असती तर निजामाचा औरंगाबादेंत विनायास प्रवेश होऊन तीवर सत्ता न बसती. क्र. ३१ वरून मुबारिजखान सुमारें पावणेदोन महिन्यांच्या अवधींत हैदराबादेहून सुमारें पावणेदोनशें मैल अंतरावर असलेल्या नदिड गांवापर्यंत आला असें दिसतें. या सुमारास निजामही औरंगाबादेच्या अगदीं जवळ आला होता. आणि त्याचा अधिकारी मुहम्मद इनायतखान औरंगाबादेंत होताच. यामुळें औरंगाबादेस जाण्याचा विचार रहित करून त्यानें थोड्या रोस धरला असावा. यांत उल्लेखिलेला फर्मान कुवर बहादुरानें मुबारिजखानास मदत करावी अशाविषयीं बादशहाकडून आला असला पाहिजे. कमिशनसंबद्ध पत्रांत तसा निर्देश ही आला आहे. फर्मान झाला व आला तरी कुवर बहादुराच्या मनांत आपण मुबारिजखानास मिळावें, कीं निजामाची साथ करावी अशाविषयीं चलबिचल सुरू झाली. ती काढून टाकून त्यानें आपल्या पक्षांतच यावें म्हणून मुबारिजखान स्वतः, फर्मानाचें महत्त्व व बादशाही

छेची लालूच या दोन गोष्टींच्या आधारानें प्रयत्न करीत आहे. पण येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, या प्रश्नामुळें अनेक मराठे सरदार व छत्रपति शाहू यांस देखील जर पेच पडला होता तर इतरांची कथा काय! ३३ वें पत्र अज्दुद्दौला बहादर कसवरह जंग यानें लिहिल्याचें आवरणावरील शेरा व शिक्का यांवरून स्पष्ट होतें. याचें खरें नांव इवज (मराठींत ऐवज) खान असून हा निजामाचा कित्येक वर्षांचा नोकर व काहीं वर्षे औरंगाबादचा अधिकारी होता. याचा मुलगा सय्यिद् जमालखान हाही निजामाच्या नोकरींत होता (हिंमा २१९-१२). या पत्रांत मलू नांवाच्या शत्रुसरदाराचा उल्लेख आहे. या वेळीं कुवर बहादुर मोगलाकडे अर्थात् निजामाकडेच होता. तेव्हां मलू हें नांव बहुधा मल्हारराव होळकराबद्दल आलें असावें.

## ३४

[१] श्री. सरदार आबासो मुजुमदार यांनीं फार दिवसांपूर्वी हिंगणी (नंदुरबार, खानदेश) येथील श्री. विक्रमगीर गोसावी यांजकडून आणलेले सत्तावीस फार्सी कागद माझे हवाली केले होते. ते वाचून पहातां त्यांत फक्त तीन कागद इतिहाससंबंधी आढळले. पैकीं (१) पहिलें पत्र दुसऱ्या आलमगीरचा जुलूस सन २ शाबान ११ = श. १६७७ अधिक ज्येष्ठ शुद्ध १३ = इ. १७५५ मे २३ या तारखेचें असून त्यांत बाळाजी बाजीराव व रघुनाथराव यांस पाठविलेल्या पोषाखांचा तपशील आहे. या तारखेच्या आदले दिवशींच आलमगीरच्या कारकिर्दीचा दुसरा वाढदिवस होता. तेव्हां तन्निमित्त ही पोषाखाची पाठवणी असावी. आलमगीरला गादीवर बसविण्यास निमित्त कारण रघुनाथरावाची दिल्लीची पहिली स्वारी (इ. १७५३—५५) झाली असल्यानें त्याचा पोषाखपाठवणींत समावेश झाला होता. विशेषतः तो या तारखेस या स्वारींतून परतलाही नव्हता. (२) दुसरें पत्र ता. ८ जिल्काद दुसऱ्या आलमगीरचा जुलूस सन ६ = श. १६८१ आषाढ शुद्ध ९, इ. १७५९ जुलै ४ या वेळचें असून त्यांत गोविंद पंडिताच्या सांगण्यावरून पत्रग्राहकाची आई मेल्याचें कळल्यामुळें त्याचें सांत्वन करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. राजवाडे खंड २ पृ. १५० वर शक १६८० कार्तिक वद्य १३ सोमवार = इ. १७५८ नोव्हेंबर २८ या दिवशीं ताई मृत्यु पावली अशी नोंद आहे. ताई म्हणजे काशीताई ही बाळाजी बाजीरावाची आई होय. गोविंद पंडित म्हणजे गोविंदपंत बुंदेले असणें शक्य आहे. अर्थात गोविंदपंत बुंदेल्यानें पत्रलेखकास बाळाजी बाजीराव प्रधान यांची आई वारल्याचें कळविल्यानंतर नानासाहेबास सांत्वनार्थ हें पत्र लिहिलेलें दिसतें. या पत्राचें आवरण व बेहस ही पत्राबरोबर नसल्याचें पत्रलेखक व पत्रग्राहक निश्चयानें कोण हें समजत नाहीं येवढें मात्र ध्यानांत ठेवलें पाहिजे.

(३) तिसरें पत्र अधिक महत्त्वाचें असल्यानें तें विस्तारशः दिलें आहे. त्यांत २ रा शाह आलम बादशाही मर्जीविरुद्ध अजीमाबादेस (पाटण्यास) येत आहे, तरी त्यास हर उपायानें दस्तगीर करून हुजूर पाठवावें इत्यादि मजकूर आहे. प्रो. सर जदुनाथ

मराठाज यांच्या फॉल ऑफ दि मुघल ऐंपायर या पुस्तकाच्या दुसऱ्या खंडांत पृ. ५१४ ते ५१७ या पृष्ठांत याविषयीं घडलेलीं मासिर-इ-आलमगीरि-इ-सानी या हस्तलिखितांत आलेल्या माहितीचा अनुवाद केला आहे. ती माहिती व ह्या पत्रांतील माहिती यांत कोठें कोठें फरक आहे, तरी तो किरकोळ असल्यानें उपर्युक्त हस्तलिखितांतील माहिती सत्य आहे असें समजण्यास हरकत नाहीं. पण हस्तलिखितांत पत्रांतल्याहीपेक्षां अधिक माहिती आली आहे हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. लेखक व वाचक या बाबतींत या पत्राची गत वरच्या पत्राप्रमाणेंच आहे. पण हें बहुधा बाळाजी बाजीराव पेशव्याचीच शक्यता सर्वांत अधिक आहे.

३५

हें व पुढील आणी दोन्ही पत्रें महेंद्रपुराचे कलेक्टर श्री. मंगेश गोविंद कणिंदर यांनीं मिळवून दिलीं. हें उत्तर हिंदुस्थानांतील अन्याय प्रदेशावर केलेल्या मराठा मुलुखाच्या नेमणुकीसंबंधीं असल्यानें येथें प्रकाशित करीत आहे. यामध्यें तारीख नाहीं, पण यावर सवाई माधवरावाचा मोठा वाटोळा फार्सी शिक्का असून त्यांत हि. १२०४ व दुसऱ्या शाह आलमचा जुलूस ३२ हीं सालें दिलीं आहेत. पैकीं हि. १२०४ इ. १७८९ च्या सप्टेंबर २१ ला व ३२ जुलूस इ. १७८९ डिसेंबर २६ ला सुरु होतात. तेव्हां हें पत्र इ. १७८९ नंतर सोडलें असलें पाहिजे.

३६

हें पत्र फार्सीत असून यांत ता. ११ रमजान रोजीं श्रीरंगपट्टण येथें झालेल्या लढाईची व तीपुढील हालचालींची थोडी हकीकत असून इंग्रज, पेशवे व पत्रलेखक हे त्रिवर्ग विचार करीत असल्याचें दाखविलें आहे. त्यावरून असें वाटतें कीं, इ. १७९० मध्यें मराठे, इंग्रज व निजाम या त्रिकूटानें टिपूविरुद्ध युद्ध पुकारून इ. १७९२ मध्यें त्याचा शेवट केला, त्यांत इ. १७९१ मे १५ रोजीं लढाई झाली तिचें या पत्रांत वर्णन आहे. हें पत्र कोणी कोणास लिहिलें हें नीट समजत नाहीं. एकंदर पत्राची भाषा पाहिली तर हें लॉर्ड कॉर्नवॉलिसनें पाठविलें असावें असें वाटतें व माहिती सुद्धां इंग्रजांच्या हालचालींची आहे. आरंभीच किल्ले बंगलूर जिंकल्याची नोंद आहे. लॉर्ड कॉर्नवॉलिसनें हा किल्ला ता. १२ मार्च १७९१ रोजीं जिंकला. तदनंतर ता. ११ रमजान (१५ मे, वैशाख शु. १२ श. १७१३) रोजीं ही लढाई झाली. हींत इंग्रजांनीं पांचसहा तोफा जिंकल्या, पण त्यांच्या सेनेंत दाणावैरणीचा भयंकर तुटवडा पडला, रोगानें व खाण्यावाचून तोफांचे व सामानाचे हजारों बैल मेले, इत्यादि माहिती मराठी पत्रांतूनही आली आहे (ऐलेसं ९।३३४६, ३३४७). हरिपंत फडके व परशुरामभाऊ यांची लॉर्ड कॉर्नवॉलिसशीं पहिली भेट ता. २९ मे रोजीं झाल्यावर दोन्ह सैन्याच्या पुढील योजनांविषयीं बरीच चर्चा झाली आणि ता. ६ जून रोजीं दोन्ह सैन्यें इच्छित स्थळीं जाण्यासाठीं वाट चालू लागलीं (मेजर डिरोमकृत 'ए नॅरेटिव्ह ऑफ दि कॅंपेन इन इंडिया...टिपू सुलतान' लंडन १७९३, १७९४ पृ. ६,७,१५).

# सूची


अअजमखान १८
अकबराबाद ६
अखेमान २९
अजीमाबाद (पटणा) ३४
अजीमुल्लाहखान १४
अथपूर २४
अयामल राजा ११,१८,२४
अलीवर्दीखान २३, २४
असदयारखान २२
अहमदखान ३५
आलमगीर २ रा ३४
आली गौहर शाहजादा मुहम्मद ३४
आसफखान २६
आसफजाह बहादर ४, १४, १७, १८, २०, ३६
इख्तियारुल्मुल्क बहिलमी २५
इनायतुल्लाह काजी २९
इमाम कुली आका २८
उज्जयिनी ७, ९, १०
उधोजी ८
ऐनुल्मुल्क २५
ओडिसा २४
औरंगजेब २९
औरंगाबाद (खुजिस्ता बुनियाद) १३
कटक २४
कटवा २४
कर्मासेर्ग २५
कमरुद्दीनखान २१, २३
कर्नाटकी प्यादे १
कानोजी २५
किरपाराम राव १७
कुडाळ २८
कुळकर्णी तिम्मरस सुरप २५
कृष्णाजी लखमरस २८
केसू ३३
खानदेश १३
खानदौरान ३, १०, १४
खान बाबा मुस्तफाखान २८
खुजिस्ता बुनियाद (औरंगाबाद) ३०
खर्दा २४
गंगा ९, ३०
गया ९
गोवें २७
गौर ब्राह्मण १७
गौरस वैद्य १
चतुर्भुज २९
चवथा ६, १६, १८
चारण १३
चांदा २४
चिमाजी आप्पा ४, १६
चौधरी २९
छत्रसाल १८
जयनगर ७
जयपूर सवाई ३४
जहानाबाद (डुगडा) २९
जाधव पिराजी १९
जिंजी १, १३

तुम्र ११
तंजावर १, ११
तानजंग बहादुर १४
त्रिमल पंडित २५
त्रिंबकजी १
त्रिमलनायक १
दाभोळ २७
दुराहा (जहानाबाद) २९
देवगड २४
देसाई विठ्ठल चंदुरास २५
धोंडो पंडित ४, ६–१०, १५, २२
नबाब ४, १४, २८
नर्मदा ६, १६–१८
नादिरशाह १४
नांदेड ३१
नासिरजंग बहादुर १४
निजामुद्दौला १७
नियाझबेग १५
नेमा (शिंदे) २९
पथेत २४
परशुरामभाऊ ३६
पराग (प्रयाग) १८
पवार यशवंतराव १९
पानिपत १५
पाबासाहेब (बाबासाहेब) १
पाळेगार १
फर्खुंदह बुनियाद (हैद्राबाद) ३०
फैजाबाद ३६
बक्षीउलममालिक ४
बंगलूर ३६
बंगाल २३, २४
बंजारी २६
बसेटी हतगोटे २५
बहमती बैद १
बार्गीगार ३, ५, १०–१२, १४, १७
बापूजी मल्हार ३५
बापूराव मल्हार ४, ५, ८, १७
बाळाघाट ३६
बाळाजी बार्गीगार १६–२४
बिरणाहळ्ळी २५
बिहार ३४
बीड ३१
बुरांनुल्मुल्क १४
बुलगोडा २५
भामती बैद १
भास्कर २४
भुजबलराव १
मथुरा ९
मथुरा (मदुरा) १
मनेबार १
मन्सुरजंग १२
मल्ल ( मल्हारराव होळकर ) ३३
मसना ! (दिशा) १८
महादेव पंडित ३, ११, २२–२४
महाराज (शहाजी) १
महाराजाधिराज ६, ७, ११, १७, १८
मलगोडा २५
माळवा ४, १६, १८, २१, २६
मुबारिझखान २
मुर्शिदाबाद २४
मुस्तफाखान २८
मुहम्मदपूर २६
मुहम्मद रिजा हवालदार मिर्झा २७
मुहम्मद सईदखान १८
मुहम्मद हिदायतबक्ष ३४
मेदिनीपूर २४
यमुना १८
यादगारखान ३, ४, ७, १०, १२

रघूजी (भोसले) २३, २४
रणथंबोर ६
रणदुल्लाखान २७
राजापूर २७
रामनारायण बहादुर ३४
रामेश्वर १
रायल १
रावसाहेब ३४
रेवदंडा २७
ल्हमाजी ज्योती १
लिंगोजी २५
वलीउन्ममालिक (कमरुद्दीनखान) ६
वऱ्हाड १३
विजयराघव तंजावरकर १
विजापूर १३, २५
वेंगुर्ले २८
वेणीराम जसराम २६
शाह आलम २ रा ३५
शाहगड ७
शाहजहानाबाद १४
शाहू २, ११
शिंदे राणोजी ७, ८, १९
शिवनेर १३
श्रीपतराव परशुराम (प्रतिनिधि) २
श्रीरंगपट्टण ३६
समसामुद्दौला १८, ३२
संबळपूर २४
सय्यद जमालखान ८
सय्यद हुसेन लश्करी २५
सहारणपूर ३५
सारंगपूर २६
सिकंदर खवास २५
सिन्नर ३३
सिरोंज २४
सुलेमान शेख २५
सेतुबंध १
हनगोटे २५
हरिपंत तात्या ३६
हिंदुस्थान १६
हुसेनसागर ३०
होळकर मल्हारजी १९, ३३

# संक्षेप

इर्विन–लेटर मुघल्स, खंड व पृष्ठ

ऐफासा–ऐतिहासिक फार्सी साहित्य, खंड व लेख

ऐलेसं–ऐतिहासिक लेखसंग्रह, भाग व लेख

ऐसंसा–ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, खंड व लेख

पुद–पुरंदरे दप्तर, भाग व लेख

पद–पेशवे दप्तरांतून निवडलेले कागद, खंड व लेख

फामा–मासिरुल उमरा, फार्सी मूळ, खंड व पृष्ठ

बापेरो–बाळाजी बाजीराव पेशवे रोजनिशी, खंड व परिच्छेद

मच–महेंद्रस्वामी धावडशीकर यांचे चरित्र, लेख

रा–राजवाडेकृत मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड व पृष्ठ किंवा लेख

शारो–शाहू रोजनिशी, पृष्ठ किंवा परिच्छेद

शिचप्र–शिवचरित्रप्रदीप, पृष्ठ

शिचवृस–शिवचरित्रवृत्तसंग्रह खंड व पृष्ठ

शिश–शिवकालीन शकावली, पृष्ठ

हिंद–हिंगणे दप्तर, खंड व लेख

हिंमा–मासिरुल उमरा, हिंदी भाषांतर, भाग व पृष्ठ

इ–इसवी, जु–जुलूस, ता–तारीख, पृ पृष्ठ, इत्यादि नित्याचे संक्षेप येथें दिलेले नाहींत

---

पुणें, पेठ भांबुर्डा, घ न ११५।१ येथें आर्यभूषण मुद्रणालयांत रा रा. केशव गणेश शारंगपाणी यांनी छापिलें व चिटणीस, भा. इ स मंडळ, यांनी ३१३ अ, सदाशिव पेठ, पुणें न २, येथें प्रसिद्ध केलें.